


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# क्षणचित्रे




'मसाप' आयोजित 'दिवाळी अंक २०१६ स्पर्धा' पारितोषिक वितरण समारंभात पुरस्कार्थींसोबत प्रमुख अतिथी ज्येष्ठ लेखिका इंदुमती जोंधळे आणि दैनिक लोकमतचे संपादक विजय बावीस्कर व परिषदेचे पदाधिकारी.



प्रा. माधव राजगुरू यांच्या 'सुगम मराठी शुद्धलेखन' या पुस्तकाचे प्रकाशन करताना डॉ. प्र. ज्ञा. परांजपे, डॉ. न. म. जोशी आणि पदाधिकारी.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५८, जानेवारी ते मार्च २०१७



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका




मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात समन्वयक
**शिरीष चिटणीस**

व्याकरण सल्लागार
**माधव राजगुरू**

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अशोक देव**

मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
**महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना**
**सदाशिव पेठ, पुणे**
**४११०३०.**

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३५८
जानेवारी - मार्च २०१६



# अंतरंग










संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# ९० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या निमित्ताने...

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा अंक क्र. ३५८ आपल्या हाती पडेल तेव्हा अ. भा. म. साहित्य संमेलनाचे सूप वाजून जवळ-जवळ दोन महिने पूर्ण होतील. मराठी माणूस, मराठी साहित्यसंस्कृती आणि ग्रंथप्रकाशक संमेलनाची आतुरतेने वाट पाहत असतात. या वर्षी डोंबिवली येथे संमेलन पार पडले. अगदी पिंपरी-चिंचवड येथील संमेलनाइतके भव्य आयोजन नसले तरी स्वागताध्यक्ष गुलाबराव वझे आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी संमेलनाचे आयोजन नेटके केले होते. परिसंवादाचे विषय चांगले होते. बाल-कुमार-युवा अशा सर्व वयोगटांतील प्रतिभावंतांना प्रतिनिधित्व मिळेल याची काळजी आयोजकांनी घेतली होती. संमेलनापूर्वी संमेलनाध्यक्षपदाच्या उमेदवारावर 'शाई फेकण्याचे' कथित प्रकरण वगळता काहीही वाद झाले नाहीत. कदाचित यामुळेच की काय, रसिकांनी या संमेलनाकडे जशी उपस्थिती लावायला हवी होती तशी लावली नसावी! ग्रंथविक्रीदेखील खूप कमी प्रमाणात झाली, असे अनेक प्रकाशकांकडून समजले. मराठी साहित्यरसिकांची ही संमेलनाप्रति अनास्था पाहून खेद झाला. जयंत नारळीकरांचे वक्तव्य श्रोत्यांसाठी नेहमी पर्वणीच असते. याही वेळी नारळीकरांनी आपल्या अभ्यासपूर्ण भाषणाने रसिकांना आनंद दिला.

संमेलनाध्यक्ष डॉ. अक्षयकुमार काळे यांचे अध्यक्षीय भाषण विचारप्रवर्तक होते. त्यांनी नेहमीप्रमाणे संयत शैलीत अभ्यासपूर्ण विचार मांडले. संमेलनाध्यक्षांच्या भाषणावर चर्चा, हा अभिनव उपक्रम महामंडळाने सुरू केला. हे स्वागतार्ह पाऊल आहे. गेल्या वर्षीप्रमाणेच 'कविकट्टा' या वर्षीही गाजला. कविकट्ट्याचे प्रमुख राजन लाखे आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी महाराष्ट्रातील बहुसंख्य कवींना व्यासपीठ मिळवून दिले. मुख्य कविसंमेलनापेक्षा कविकट्ट्यावरील कविता चांगल्या वाटल्या. परिसंवादामध्ये विषयांचे जितके वैविध्य होते तितके इतर संमेलनात अभावानेच आढळले.

८९ वे संमेलन होऊन वर्ष झाले तरी त्याचे 'कवित्व' अजूनही संपलेले नाही. कविकट्ट्यावरील सहभागी कवींच्या '८९ कविता' मा. पी. डी. पाटील यांच्या डी. वाय. पाटील संस्थेने देखण्या स्वरूपात आणि तितक्याच देखण्या समारंभात प्रकाशित केल्या. या ८९ कवींना घसघशीत रकमेचा पुरस्कारही मा. पी. डी. पाटील यांनी दिला.

पिंपरी-चिंचवडच्या संमेलनाच्या भव्य आयोजनाची आणि वादांची खूप चर्चा झाली; परंतु या संमेलनात झालेले दर्जेदार कार्यक्रम, त्यांना रसिकांनी भरभरून दिलेली दाद आणि स्मरणिकेऐवजी 'मराठी भाषा संचित आणि नव्या दिशा' या ग्रंथाची म्हणावी तशी चर्चा झाली नाही. उपरोक्त ग्रंथ हा मराठी भाषेची सद्यकालीन स्थिती आणि तिची भावी वाटचाल कशी असेल याची मूलगामी चिकित्सा करतो. अनेक मान्यवरांनी या ग्रंथात लेखन केले आहे. पत्रिकेच्या पुढील अंकात या ग्रंथाविषयी वाचकांना विस्तृत माहिती देऊ. मराठी रसिकांनी अ. भा. मं. सा. संमेलनाला हजेरी लावावी यासाठी काय केले पाहिजे, याचा विचार महामंडळाने केला पाहिजे. छोट्या शहरांमध्ये संमेलन द्यावे; चांगले कार्यक्रम, योग्य प्रतिभावंत वक्ते-कवी-कथा-कथनकार-साहित्यिकांना संधी आणि संमेलनाबाबतची उत्सुकता वाढविणारे संमेलनपूर्व कार्यक्रम आयोजित करावेत. साहित्य संमेलन हे उत्सवी जरूर असावे; परंतु त्यामध्ये मराठी साहित्याचा, भाषेचा आणि समकालीन साहित्य चर्चेचा समावेश असला पाहिजे. खाऊगल्लीची गर्दी ग्रंथप्रदर्शनात आणि मंडपामध्ये का दिसत नाही याचा विचार व्हावा. या वेळी विविध माध्यम प्रतिनिधींनी संमेलनाला आलेल्या लेखक-कवी आणि रसिकांच्या चर्चा आयोजित करून चांगला पायंडा पाडला आहे.

दिवाळी अंक आणि नियतकालिकांनी अनेक नवोदित लेखकांना लिहिते केले आहे. विशेषतः दिवाळी अंकाची साहित्यरसिक उत्सुकतेने वाट पाहत असतात. नित्यनेमाने



अनुक्रमणिका

दिवाळी अंक घेणे, वाचणे ही मराठी भाषकांची वैचारिक दिवाळी साजरी करण्याची रीत आहे. दिवाळी अंक आणि नियतकालिके काढणे हे मोठे जिकिरीचे काम साहित्याच्या आस्थेपायी प्रकाशक करीत असतात. त्याची उचित दखल म. सा. पत्रिकेमधून घेण्याचा मानस आहे.

ज्येष्ठ कथालेखक वामन होवाळ, ज्येष्ठ नाट्यसमीक्षक, वि.भा. देशपांडे यांचे नुकतेच निधन झाले. आपल्या वैशिष्ट्यपूर्ण कथालेखनाने होवाळ साहित्यरसिकांना परिचित होते. त्यांचे 'बेनवाड', 'येळकोट'सारखे कथासंग्रह आणि 'जपून पेरा बेणं', 'आंधळ्याची वरात बहिऱ्याच्या घरात' यासारखी लोकनाट्ये लोकप्रिय झाली. दलित-ग्रामीण आणि झोपडपट्टीतील लोकांचे जीवन होवाळ यांच्या कथेत आले आहे. वि. भा. देशपांडे हे नाट्यसमीक्षक म्हणून साहित्यरसिकांना परिचित आहेत. 'नाट्यकोशा'सारखा महत्त्वाचा बृहद्प्रकल्प त्यांनी पूर्ण केला. 'नाटककार खानोलकर', 'निवडक नाट्यप्रवेश', 'निवडक नाट्यमनोगते', 'प्रतिमा : रूप आणि रंग आणि रंगयात्रा' ही संपादित पुस्तके त्यांच्या नाट्यविषयक मर्मदृष्टीची साक्ष देतात. नाट्यविषयक कोणताही संदर्भ वि. भा. देऊ शकत. अनौपचारिक गप्पांमधूनही अनेक किस्से आणि प्रसंग ते सांगत. त्यामुळे त्यांच्याशी चर्चा हा आनंददायी अनुभव असे. गं. ना. जोगळेकर यांच्या काळात ते म.सा. परिषदेचे प्रमुख कार्यवाह होते. गं. ना. सरांच्या निधनानंतर ते कार्याध्यक्ष झाले. जोगळेकरांनी सुरू केलेला वाङ्मय इतिहासाचा प्रकल्प वि. भां. च्या काळात पूर्णत्वाला गेला.

ह्या अंकाचे काम सुरू असतानाच ज्येष्ठ आंबेडकरी विचारवंत डॉ. कृष्णा किरवले यांच्या निर्घृण हत्येची बातमी आली. अशा प्रकारे किरकोळ कारणावरून प्रा. किरवले यांची हत्या होते हे प्रचंड दुःखदायक आहे. विचारवंतांच्या हत्या होणे हे समाजाच्या दृष्टीने अधोगतीचे लक्षण आहे. या हत्येची निःपक्षपातीपणे चौकशी व्हावी. किरवले सर हे कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठातून नुकतेच निवृत्त झाले होते. त्यांच्या अमानुष हत्येने केवळ आंबेडकरवादी विचारधारेचीच नाही, तर पुरोगामी महाराष्ट्राची अपरिमित हानी झाली आहे. शिवाजी विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. द. ना. धनागरे, प्रा. गजमल माळी, डॉ. कृष्णा किरवले, डॉ. वि. भा. देशपांडे आणि वामन होवाळ यांना म. सा. परिषद आणि पत्रिकेतर्फे आदरांजली!

या अंकामध्ये समीक्षेवरील डॉ. सतीश बडवे आणि डॉ. हरिश्चंद्र थोरात यांच्या भाषणाचे लेख छापले आहेत. डॉ. हरिश्चंद्र थोरात यांच्या 'मूल्यभानाची सामग्री' या ग्रंथास रा. श्री. जोग पुरस्कार नुकताच जाहीर झाला. हा पुरस्कार स्वीकारताना डॉ. थोरात यांनी मांडलेले विचार मूल्यभानाच्या सामग्रीबद्दल मर्मदृष्टी देतात. पाचोरा येथील समीक्षा संमेलनाचे बीजभाषक डॉ. सतीश बडवे यांचे बीजभाषण मराठी समीक्षेचा नकाशा रेखाटते. 'आलोक' या कथासंग्रहाबद्दल आसाराम लोमटे यांना साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला. प्रा. डॉ. नंदकुमार मोरे यांचा लोमटे यांच्या कथेवरील लेख त्यांच्या कथेची वैशिष्ट्य स्पष्ट करतो. मनस्विनी लता रवींद्र यांच्या कथेवरील प्रा. किरण गाढवे यांचा लेख मनस्विनींच्या कथांचे वेगळेपण अधोरेखित करतो. वनाधिपती विनायकराव पाटील यांच्या 'गेले लिहायचे राहून' या पुस्तकावरील रेखा भंडारे यांचा लेख रसिकांना नक्कीच आवडेल. वामन होवाळ आणि डॉ. वि.भा. देशपांडे यांच्यावरील आदरांजलीपर लेख या अंकात घेतले आहेत. ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ आणि साहित्यिक डॉ. न. म. जोशी यांच्या 'बखर एका सारस्वताची' या आत्मचरित्राविषयी डॉ. अमृता मराठे यांचा लेख या आत्मचरित्रातून न. मं.चे व्यक्तिमत्त्व कसे साकार होते हे स्पष्ट करतो. डॉ. न. म. जोशी हे चतुरस्र, व्यासंगी आणि अभ्यासपूर्ण मांडणी करणारे वक्ते म्हणून साहित्य-सांस्कृतिक विश्वात परिचित आहेत. प्रभा सोनवणे यांनी घेतलेली 'पुष्पक प्रकाशना'च्या ह. ल. निपुणगे यांची मुलाखत 'उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचा ध्यास' घेतलेल्या प्रकाशकाचे मनोगत व्यक्त करते. 'अर्घ्य' या शिवाजी चाळक यांच्या काव्यसंग्रहावरील महेंद्र खरात यांचा लेखही वाचनीय आहे. डॉ. स्वाती कर्वे लिखित 'महाराष्ट्रातील स्त्री-परिषदांचा इतिहास' या ग्रंथावरील रूपाली शिंदे यांचा लेख कर्वे यांनी केलेल्या संशोधनविषयी माहिती देतो. या अंकासाठी परिषदेच्या इमारतीचे देखणे मुखपृष्ठ जयदीप कडू यांनी तयार केले आहे. पत्रिकेविषयी आणि मुखपृष्ठाविषयी अनेक मान्यवरांनी समाधान व्यक्त केले आहे. नेहमीप्रमाणेच रसिक वाचक या अंकाचेही स्वागत करतील ही आशा व्यक्त करतो.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



समीक्षा

डॉ. सतीश बडवे

# समीक्षा
## पद्धती आणि उपयोजन

**आधुनिक मराठी समीक्षेच्या वाटचालीचा साकल्याने विचार करता, इतर भाषांतील समीक्षेप्रमाणेच मराठी समीक्षा ही कालौघात स्थूलाकडून सूक्ष्माकडे, अद्‌भुताकडून वास्तवाकडे, बाह्याकडून अंतरंगाकडे, आशयाकडून अभिव्यक्तीकडे, समूहाकडून व्यक्तीकडे, वर्णनाकडून विशेषणाकडे झुकत असल्याचे जाणवते. एके काळी ही समीक्षा फार पढिक किंवा केवळ अन्वयार्थबोधक होती. पंतोजी पद्धतीच्या अन्वयार्थकथनावर तिचा भर होता. आता ती रसग्रहणप्रवण, संस्कारशील, रचनाविशेषांवर लक्ष केंद्रित करणारी अशी होत चालली आहे.**



**पा**चोरा येथील महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शाखेने समीक्षा संमेलनासाठी बीजभाषण करण्यास, खरे तर लिहिण्यास, मला उद्युक्त केले, याचे अंत:करणापासून वाटणारे समाधान मी प्रारंभीच व्यक्त करतो. समीक्षा हा वितंडाचा विषय आहे. तो तसा असायलाही हवा. अर्थातच मतभेद हे विचारव्यूहाच्या मांडणीसाठी आवश्यक असतात; पण संकुचित दृष्टीने विचार करणाऱ्यांची चलती झाली की मतभेद हे मनभेदापर्यंत जाऊन पोचतात. कळपांचे, गटातटांचे राजकारणही त्यात शिरते. सांप्रतचा काळ हा व्यक्तिनिष्ठ पद्धतीने विचार करणाऱ्यांचा आहे, हे सूक्ष्मपणे बघितले तर लक्षात येऊ शकेल. आधुनिक तंत्रज्ञानाने आपल्यातील संवाद आटवून टाकला. तिथेही व्यक्त होणारे समूह व त्यांच्या रंगणाऱ्या गृहीत चर्चा समीक्षेच्या खंडित दिशेने जाणाऱ्या असतात. 'स्वच्छंद आत्मगत प्रतिक्रिया' व्यक्त करण्याची ही रीत आहे. पण मराठी वाङ्‌मयाच्या निमित्ताने समीक्षेच्या संदर्भात बोलताना एका लक्षणीय बाबीकडे लक्ष वेधणे (मला) आवश्यक वाटते. मराठीतील मध्ययुगीन वाङ्‌मय अकराव्या-बाराव्या शतकापासून निर्माण झालेले असले तरी या वाङ्‌मयासंबंधीची समीक्षा मात्र अव्वल इंग्रजी कालखंडापासून विकसित झालेली दिसते. या समीक्षेतून विविध दृष्टिकोन प्रकट झालेले दिसतात. स्वातंत्र्यपूर्व काळातील आधुनिक दृष्टिकोन नव्या शिक्षणपद्धतीमुळे तयार झाला होता. स्वदेशविकास अस्मिताही या काळात फुललेली दिसते. नव्या समाजजीवनातील स्थित्यंतर नवविचारांना प्रेरक ठरले. नवविचाराचा झालेला उदय संतसाहित्याचे मूल्यमापन करू लागला. त्यातून समीक्षेच्या अभ्यासाची वाट तयार झाली. या काळातील वाङ्‌मयेतिहास बघितला तरी परस्परविरोधी मतमतांतरे दिसू लागतात. उदाहरण सांगायचे, तर वि.का राजवाडे यांची राष्ट्रवादी विचारसरणी आणि न्या. म. गो रानडे यांची उदारमतवादी विचारसरणी व त्यांनी एकमेकांना खो देण्याचा केलेला प्रयत्न लक्षात येतो. समीक्षेतील वितंडाचे हे एक ठळक उदाहरण आहे. प्रभावी विचारसरणी, व्यापक ऐतिहासिक परिप्रेक्ष इथे दिसते. चिकित्सक, सौंदर्यवादी, समाजशास्त्रीय दृष्टीचे प्रत्यंतर इथे येते. याशिवाय चरित्रलेखनातून व निबंधलेखनातून संतसाहित्याचा विचार केला गेल्याचे आढळते. महात्मा फुले यांनी मांडलेली भूमिका विद्रोहाचा उद्‌गार होता, तर बा.ब पटवर्धन यांनी सौंदर्यवादी दृष्टीचा पुरस्कार केला. बहुविध आयामांमधून झालेले बहुमुखी लेखन हे या समीक्षेचे खास वैशिष्ट्य असले तरी ग्रंथसमीक्षा किंवा काव्यसमीक्षा हे त्यांचे उद्दिष्ट नव्हते. मात्र, तरीही त्यातून मूल्यगर्भ अभिप्रायांची नोंद करण्याचा प्रयत्न आढळतो.







वर निर्देशित केलेले दाखले केवळ वानगीदाखल आहेत. सम्यक् ईक्षा ती समीक्षा, असे म्हटले जात असले तरी त्यात सम्यक दृष्टिकोन किती हा प्रश्नच आहे. साहित्याचा प्रांत बहुरंगी असल्याने समीक्षासुदा बहुरंगी वा बहुआयामी बनते. समीक्षेच्या क्षेत्रात अनेक पद्धती किंवा संप्रदाय रूढ झालेले आहेत. संतप्रणाली, पंडिती परंपरा, केशवसुत संप्रदाय, मर्ढेकरी किंवा नेमाडपंथी असे शब्दप्रयोग या क्षेत्रात आढळतात. असे संप्रदाय वा अशा परंपरा आजच्या साहित्याला खरोखरच उपयुक्त ठरतील का? व्यक्तिनिष्ठ लेखनाची गती आज वाढत गेल्याचे चित्र दिसते. समीक्षेच्या संदर्भात एक प्रश्न सातत्याने मनात येतो तो असा, की आपल्या समीक्षा विचाराच्या परंपरेत आरंभकाळात संस्कृत साहित्यशास्त्राचा पगडा दिसतो; पण नंतरच्या काळात, म्हणजे ब्रिटिश राजवटीत या समीक्षेने नवी वाट चोखाळली, त्यामुळे इंग्रजी विचारांचा प्रभाव लक्षात येतो. म्हणजेच मराठी समीक्षा एका बाजूने संस्कृतच्या आधाराने व दुसऱ्या बाजूने इंग्रजीच्या आधाराने विकसित झाली. मग मराठीला मराठीची समीक्षा आहे का, हा प्रश्न पडतो. याचे नेमके उत्तर देणे अवघड जाते.

प्रस्तुत संमेलनाचे महत्त्वाचे सूत्र 'समीक्षा : पद्धती आणि उपयोजन' असे आहे. विचारवंतांचा एक पक्ष असे मानतो, की समीक्षेच्या पद्धती असे म्हणण्याऐवजी दृष्टिकोन असे म्हणायला हवे. ते खरेही आहे. साहित्याचा अभ्यास सुव्यवस्थित पद्धतीने होण्यासाठी केलेला व्यवहार म्हणजे समीक्षा असते. सैद्धान्तिक समीक्षा (यालाच तात्त्विक समीक्षा असेही म्हणतात.) व उपयोजित समीक्षा असे दोन मुख्य प्रकार लक्षात घ्यावे लागतात. आधुनिक मराठी समीक्षेच्या वाटचालीचा साकल्याने विचार करता, इतर भाषांतील समीक्षेप्रमाणेच मराठी समीक्षा ही कालौघात स्थूलाकडून सूक्ष्माकडे, अद्भुताकडून वास्तवाकडे, बाह्याकडून अंतरंगाकडे, आशयाकडून अभिव्यक्तीकडे, समूहाकडून व्यक्तीकडे, वर्णनाकडून विशेषणाकडे झुकत असल्याचे जाणवते. एके काळी ही समीक्षा फार पढिक किंवा केवळ अन्वयार्थबोधक होती. पंतोजी पद्धतीच्या अन्वयार्थकथनावर तिचा भर होता. आता ती रसग्रहणप्रवण, संस्कारशील, रचनाविशेषांवर लक्ष केंद्रित करणारी अशी होत चालली आहे. उद्या हा क्रम या प्रकारचाच राहील असा निर्वाळा देता येत नाही. गरजेनुसार यात उलथापालथ होण्याची शक्यता आहेच (मराठी समीक्षेची वाटचाल, पृ. क्र. १०/१९९८)', हे गो. म. कुलकर्णी यांचे प्रतिपादन लक्षात घेणे आवश्यक ठरते; कारण मराठी समीक्षेत कमी-अधिक प्रमाणात चढ-उतार झालेले आढळतात. इंग्रजांच्या राजवटीने सांस्कृतिक आक्रमणही केले होते. परिणामी, मध्ययुगाचा अस्त झाला. आपल्या जीवनजाणिवांमध्ये नवे पर्व सुरू झाले. साहित्यनिर्मिती व मूल्यमापनाचे पारंपरिक निकष बाजूला सारून इंग्रजी समीक्षादृष्टी अधिक प्रबळ झाली. नव्या शैक्षणिक दृष्टीमुळे संस्कृत-इंग्रजी संमिश्रणही तिच्यात आहे. स्वाभाविकच भारतीय साहित्यशास्त्राचा प्रभाव ओसरत गेला व इंग्रजी समीक्षा विचार अधिक कार्यरत झाला.

अर्वाचीन काळातील समीक्षकांनी वस्तुनिष्ठ, बाह्यांगप्रधान समीक्षेचे उपयोजन केले. आशयविवेचनावर भर देणारी ही समीक्षा होती. त्यात अभिव्यक्तीविशेषांची चर्चा नव्हती. जेव्हा तिच्यात सौंदर्यवादी दृष्टिकोन स्थिरावू लागला, तेव्हा कलावंताच्या व्यक्तित्वाचा विचारही आला. चरित्रात्मक व ऐतिहासिक समीक्षा पद्धतीने उपयोजन होऊ लागले. उदाहरणार्थ, कवी, त्याचा काल, तत्कालीन परिस्थिती, कवीचे चरित्र, त्याने निवडलेले विषय, त्याच्या मांडणीचे विशेष, साहित्यकृतीतील भलेबुरेपण याविषयीची निरीक्षणे या समीक्षेत आली. नवसमीक्षेच्या काळापर्यंत या प्रकारच्या समीक्षेचे उपयोजन झालेले आढळते. कलेविषयीचा अंतर्मुख करणारा विचार नवसमीक्षेच्या काळात आलेला दिसतो. साहित्यकृतीविषयीच्या माहितीपेक्षा कलाकृती ही एक स्वयंपूर्ण 'वस्तू' आहे, हा विचार समीक्षेत दृढ होऊ लागला. कलाकृतीचे कलाकृतीपण इथे केंद्रस्थानी आले. आशयापेक्षा अभिव्यक्तीविशेषांची चर्चा यात प्राधान्याने आली. कविता हा सर्जनविशेष म्हणून तिचा विचार केला गेला. कवीपेक्षा कवितेचा विचार प्रधान ठरला. कवितेच्या कोणत्या घटकांमुळे तिचे कवितापण जाणवते याची मांडणी होऊ लागली. कवितेतील नाद, ताण, लय, पोत, प्रतिमा, प्रतीक यांची चर्चा नवसमीक्षेत रूढ झाली. कला ही मुक्त असते, अस्सल मनाने केलेली निर्मिती असते, असा युक्तिवाद पुढे आला. साहित्यकृतीविषयीच्या सर्व धारणा कशा बदलत गेल्या हे इथे लक्षात घेता येईल. समीक्षेच्या व तिच्या उपयोजनेच्या निमित्ताने अनेकविध प्रश्न उभे राहतात. मराठी समीक्षा नेमकी कुठे उभी आहे, तिच्यात कोणती स्थित्यंतरे दिसतात, जुन्या-नव्या समीक्षा पद्धतीबाबत या समीक्षेचा दृष्टिकोन कोणता आहे, तिच्यासमोरच्या समस्या कोणत्या आहेत, या साऱ्या प्रश्नांची चर्चा अपेक्षित असली, तरी वास्तव हे आहे, की



अनुक्रमणिका

मराठीत तत्त्वज्ञ समीक्षकांची वानवा आहे. कधी संस्कृत साहित्यशास्त्र तर कधी इंग्रजी साहित्यशास्त्राचा आधार घेत केलेली मांडणी पृष्ठस्पर्श झालेली आढळते. कित्येक वेळा हे जाणवते, की विधायकतेपेक्षा निषेधाचा सूर तिच्यात अधिक उमटतो. पाल्हाळ, उपरोध, उपहास यात रमणाऱ्या या समीक्षेने वाङ्मयीन-अवाङ्मयीन विचारांची गल्लतही केलेली दिसते. समीक्षेमध्येच आदर्शवाद, सौंदर्यवाद, वास्तववाद, आकृतिवाद, कलावाद यांची चर्चाही कमी प्रमाणात झाली आहे. 'वाङ्मयीन संप्रदाय' व 'वाङ्मयीन वाद व स्वरूप' या व्यतिरिक्त ग्रंथरूपाने केलेली मांडणी अभावानेच आढळेल. 'मराठी संकल्पना व मराठी साहित्य' या विषयावरील निबंधात डॉ. सुधीर रसाळ यांनी साहित्याच्या निमित्ताने काही बाबी निर्देशित केल्या आहेत. त्यांच्या मते पाश्चात्त्य रोमँटिसिझमचा एक आयता तुकडा आपण आपल्या संवेदनशीलतेचा पृष्ठभाग कापून त्या ठिकाणी जोडला. रोमँटिसिझमला आपण आपल्या संवेदनशीलतेत मुरूच दिले नाही. तिकडचा नवीनतावाद, असंगतिवाद, अस्तित्ववाद असा प्रत्येक वेळी एक नवा तुकडा आणून बसवीत जाणे, हा प्रकार सुरू झाला. मग तिकडे काय नवे येते, यावर डोळा ठेवणे आणि तसे ते येताच त्याचा एक तुकडा घाईघाईने उचलणे सुरू झाले. अशी ठिगळांची संवेदनशीलता एक दुय्यम दर्जाचे साहित्य निपजू लागली. साहित्याच्या क्षेत्रात आपण दुय्यम दर्जाचे नागरिक बनून गेलो. आपले वाङ्मयप्रकार, आपल्या शैलीची वैशिष्ट्ये, आपले छंदशास्त्र आपण गमावून बसलो. याचे मुख्य कारण पाश्चात्त्य संस्कृतीच्या स्वीकारप्रक्रियेत तिचे भारतीयीकरण करण्याचे राहून गेले.' (सुधीर रसाळ, भारतीय साहित्याची संकपना पृ. क्र. ८१) डॉ. रसाळ यांची ही निरीक्षणे साहित्याच्या संदर्भात असली तरी ती समीक्षेलाही लागू पडतात. समाधानाची बाब अशी, की अलीकडच्या काळात समाजशास्त्र, मानसशास्त्र, भाषाशास्त्र, शैलीविज्ञान अशा वेगळ्या दिशांनी समीक्षक विचार करताना दिसतात. साहित्यातील देशीपणाचे महत्त्वही वाढू लागले आहे. त्यावरील उलटसुलट चर्चाही होत आहेत; पण हे सारे अपूर्ण वाटते. 'सौंदर्यमीमांसा' यासारखा रा. भा. पाटणकरांचा ग्रंथ याला अपवाद ठरू शकेल. इथे आणखी एका गोष्टीची नोंद करायला हवी. मराठी समीक्षेत प्रयोजन विचाराला अधिक झुकते माप दिले गेले. कलावाद व जीवनवाद हा वादविषय मोठा प्रमाणात चर्चिला गेला. कला-नीती, कला-प्रचार, साहित्यातील अश्लीलता, कलाकृती चांगली व श्रेष्ठ असे अनेक वाद इथे निर्देशित करता येतील. पुरोगामी साहित्य आणि दलित साहित्याचा वाद यातच समाविष्ट करता येतो. मात्र, असे असले तरी परंपरा आणि नवता यांचा संघर्ष इथे आढळतो. मराठी समीक्षेने आपले पारंपरिक साहित्यशास्त्र व पाश्चात्यांचा साहित्यविचार यांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. अभिनव काव्यप्रकाश, काव्यलोचन, रसविमर्श या ग्रंथांची भूमिका याच प्रकारची आहे. विद्यापीठांमधील अभ्यासक्रमाच्या अध्यापनाची सोय त्यातून झाली असली तरी त्याचे स्वरूप बव्हंशी परिचयपर असल्याचे दिसते. इथेही 'भारतीय साहित्यशास्त्र' या ग्रंथाचा अपवाद नोंदवावा लागेल. विद्यापीठीय अभ्यासक्रमाचा पगडा मराठी समीक्षेवर आहे. काही चांगले समीक्षाग्रंथ त्यातून तयार झाले असे म्हणता येते.

मराठी समीक्षेतील काही समीक्षकांच्या नोंदी केल्या तर यात असणारे वृत्तिगांभीर्य ध्यानात येईल. राजवाडे यांची कादंबरीमीमांसा, केतकरांचे काव्यपरीक्षण, दि. के. बेडेकरांची रसचर्चा, गोडसे यांचे पोत व शक्तिसौष्ठव, पाटणकरांची सौंदर्यमीमांसा व अपूर्ण क्रांती, आचवलांचे रसास्वाद, रा. ग. जाधव यांची दलित साहित्य समीक्षा, सुधीर रसाळ यांचा कविता व प्रतिमेसंबंधीचा विचार आणि वाङ्मयीन संस्कृती, बागुल यांचे दलित साहित्याचे क्रांतिविज्ञान, यादव-बोराडे-कोत्तापल्ले-मुलाटे यांची ग्रामीण साहित्य समीक्षा, मंगला वरखेडे व अश्विनी धोंगडे यांची स्त्रीवादी समीक्षेची मांडणी. राजवाडे ते नेमाडे व्हाया मर्ढेकर हा मराठी समीक्षेचा एक विस्तृत पट आहे. व. दि. कुलकर्णी यांनी मर्ढेकरपूर्व मराठी समीक्षा आणि मर्ढेकरोत्तर मराठी समीक्षा असे समीक्षेचे दोन विभागच केलेले आढळतात. याचे कारण मर्ढेकरांपासूनच समीक्षेकडे आपण अधिक प्रगल्भतेने पाहावयास लागलो. साहित्याकडे पाहण्याचा एक ठरीव साचा होता; पण हा साचा पुढे टिकला नाही. मराठी साहित्याने विविध पद्धतीची नवी रूपे धारण केल्याने समीक्षकांसमोरच खरे आव्हान उभे राहिले आहे. मराठी वाङ्मयाच्या विस्तारलेल्या कक्षा, विविध जातिस्तरांतून घडलेला नवा लेखकवर्ग, वाङ्मयप्रकारांच्या क्षेत्रातील लेखनप्रयोग यामुळे मराठी साहित्याची रूपे बदलत गेलेली दिसतात; पण त्याला सामोरे जाणारी व परिवर्तनाला न्याय देणारी समीक्षा मात्र निर्माण झालेली नाही. खरे तर लिहिल्या जाणाऱ्या प्रत्येक साहित्यकृतीची समीक्षा होण्याची आवश्यकता असते. तथापि नवोदितांचे लेखन समीक्षेच्या प्रतीक्षेतच ताटकळत राहिलेले दिसते.

एखाद्या साहित्यकृतीचे मर्म ओळखण्यासाठी ती साहित्यकृती आणि तिची मागणी लक्षात घेऊन समीक्षेचे शब्दांकन होते. उपयोजित समीक्षेबाबत वाद, संप्रदाय, प्रवाह, प्रकार अशी साहित्यकृतीची जातकुळी तपासून एखादी नियमावली सिद्ध करणे, तिच्या आधारे मूल्यमापन, तुलना यांचीही मदत घेऊन त्या कृतीच्या मर्माचा शोध घेणे हे काम होत असते. यात समीक्षकाची भूमिका महत्त्वाची असते असे सांगण्यात येते. एका मर्यादेपर्यंत ते खरेही आहे; पण अशा घट्ट भूमिकेमुळे एखाद्या साहित्यकृतीवर अन्यायही होण्याचा संभव असतो.

गुणात्मक व संख्यात्मकदृष्ट्या ही मराठीची समीक्षा खुरटल्याचे चित्र दिसते. काळ आणि गटातटांमध्ये समीक्षकांची विभागणी झाल्याने निरोगी वाङ्मयव्यवहार होताना दिसत नाहीत. उपलब्ध बहुसंख्य समीक्षक–अभ्यासकांचा दर्जा समाधानकारक असल्याचे आढळत नाही.

मराठी समीक्षेचे अध्यापन करताना समीक्षा पद्धतींचा विचार केला जातो. चरित्रात्मक, ऐतिहासिक, समाजशास्त्रीय, रूपवादी, संरचनावादी, वैज्ञानिक, विरचनावादी, मानसशास्त्रीय, आदिबंधात्मक अशा पद्धती मराठी समीक्षेच्या क्षेत्रात आढळतात. याशिवाय वास्तववाद, अतिवास्तववाद, अस्तित्ववाद, मार्क्सवाद, स्त्रीवाद, गांधीवाद, आंबेडकरवाद, देशीवाद, आधुनिकतावाद, उत्तर आधुनिकतावाद, वसाहतोत्तरवाद या संकल्पनाही समीक्षाविचारात अंतर्भूत आहेत. या वादांचे अथवा समीक्षा पद्धतींचे तंतोतंत उपयोजन मात्र समीक्षेत आढळत नाही. 'समीक्षा पद्धतींमध्ये त्या त्या स्वरूपवैशिष्ट्यांचा विचार केलेला आढळतो. एखाद्या साहित्यकृतीचे मर्म ओळखण्यासाठी ती साहित्यकृती आणि तिची मागणी लक्षात घेऊन समीक्षेचे शब्दांकन होते. उपयोजित समीक्षेबाबत वाद, संप्रदाय, प्रवाह, प्रकार अशी साहित्यकृतीची जातकुळी तपासून एखादी नियमावली सिद्ध करणे, तिच्या आधारे मूल्यमापन, तुलना यांचीही मदत घेऊन त्या कृतीच्या मर्माचा शोध घेणे हे काम होत असते. यात समीक्षकाची भूमिका महत्त्वाची असते असे सांगण्यात येते. एका मर्यादेपर्यंत ते खरेही आहे; पण अशा घट्ट भूमिकेमुळे एखाद्या साहित्यकृतीवर अन्यायही होण्याचा संभव असतो,' (अ. वा. कु. उपयोजित समीक्षा : लक्षणे आणि पडताळणी, पृ. ३, प्रस्तावना/२००३) असे डॉ. अ. वा. कुलकर्णी यांना वाटते. उपयोजित समीक्षेची काही उदाहरणे त्यांनी दिलेली आहेत. तोतयाचे बंड (श्री. कृ. कोल्हटकर), हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्या आणि श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन (वा. ल. कुलकर्णी), इंदिरा यांची काव्यसृष्टी आणि ज्ञानेश्वरीतील तृष्णबंध (म. सु. पाटील) इ. इथे आस्वादक समीक्षेचीही नोंद करायला हवी. ही समीक्षेतील सर्वसमावेशक पद्धती आहे असे म्हणता येईल. साहित्यकृतीचा आस्वाद हे या पद्धतीचे साध्य असते. खरे तर आस्वादक समीक्षेचा संचार जवळपास सर्वच पद्धतींत आढळतो; पण या सर्वांचे संयोजन कसे करावे याची दिशा अद्याप गवसलेली नाही.

नवसमीक्षा ही मर्ढेकर युगात उदयास आली. या समीक्षेने आकृतिबंध, शैलीविशेष यांवर विशेष भर दिला, 'सौंदर्यानुभव' (प्रभाकर पाध्ये), 'सौंदर्यमीमांसा' (रा. भा. पाटणकर) व 'सृष्टिसौंदर्य आणि साहित्य' (शरदचंद्र मुक्तिबोध) हे तिन्ही ग्रंथ मौलिक ठरतात. पाध्ये यांची भूमिका शुद्ध कलावादी, तर मुक्तिबोधांच्या ग्रंथाने मार्क्सवादी भूमिकेतून सौंदर्यशास्त्राचा विचार केलेला दिसतो. पाटणकरांनी पाश्चात्त्य संकल्पनांचा आराखडा वा नकाशा उलगडलेला आहे. समीक्षा उपयोजनेच्या दृष्टीने मराठी समीक्षेची ही अर्थपूर्ण घटना मानावी लागते. गो. वि. करंदीकरांनी पाश्चात्त्य सौंदर्यविचारांचा परिचय 'ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र' या ग्रंथात करून दिला आहे. साहित्याच्या जुन्या–नव्या संकल्पनांचा परामर्श वि. ना. ढवळे यांच्या 'साहित्याचे तत्त्वज्ञान' या ग्रंथातून होतो. प्रा. गंगाधर पाटील यांनी 'समीक्षेची नवी रूपे'मधून समीक्षेची नवी दृष्टी मांडलेली दिसते. के. रं. शिरवाडकरांनी 'मार्क्सवादी समीक्षा विचार' ग्रंथातून कलाजीवन संदर्भांचे नवे भान प्रकट केले आहे. गंगाधर गाडगीळ यांनी 'खडक आणि पाणी' व 'साहित्याचे मानदंड'मधून केलेले विविध पैलू उलगडत समीक्षा लिहिली, नवकथा व नवसमीक्षेसंदर्भातील पूर्वग्रह बाजूला सारण्याचा प्रयत्न केला. फडके यांच्या सौंदर्यवाद व साहित्यकृतीच्या रचनाबंधाला बाजूला सारून जीवनाशयावर भर दिलेला दिसतो. थोडक्यात, स्वातंत्र्योत्तर काळातील समीक्षेने

साहित्याचे सांस्कृतिक संबंध उकलण्याचा प्रयत्न केलेला दिसतो; पण तरीही या समीक्षेत प्रकट होणारा समाजशास्त्रीय विचार अपुराच राहतो. 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन' या रा. श्री. जोगांच्या ग्रंथातील अभिरुचीचा विचार अपूर्णच असल्याचे जाणवते.

साठोत्तरी काळात जे विविध वाङ्मयीन प्रवाह आले त्यांचाही स्थूल विचार इथे करता येईल. आनंद यादव (ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि समीक्षा), डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, रा. रं. बोराडे, द. ता. भोसले यांनी ग्रामीण साहित्य चळवळीला गती दिली, पण समीक्षा क्षेत्रात फार मोठे कर्तृत्व सिद्ध केलेले नाही. मध्यवर्ती साहित्याचाच एक भाग म्हणून ते विकसित झाले. मध्यवर्ती साहित्यधारणेपासून ते पूर्णतया विभक्त होऊ शकलेले नाही. ही समीक्षा काहीशी धूसरच राहिली. वैचारिक मांडणीबाबतही तिने स्वतंत्र ठसा उमटवला असे म्हणता येत नाही. याउलट, दलित साहित्याची निर्मिती ही महत्त्वाची घटना या काळात घडली. या साहित्याने पांढरपेशा प्रवृत्तीची कोंडी मोडून काढली. या साहित्याची समीक्षा प्रारंभी लेखकांना आंजारणारी, गोंजारणारी होती; पण हळूहळू त्यात बदल होत गेला. विद्यमान समाजव्यवस्थेला व परंपरेला नकार देणारे विद्रोहाचे मूल्य या समीक्षेला लाभले. अब्राह्मणी साहित्यशास्त्राचा उदय त्यातूनच झाला. भालचंद्र फडके, रा. ग. जाधव, अर्जुन डांगळे, बाबुराव बागुल, प्रभाकर मांडे, शंकरराव खरात, जनार्दन वाघमारे, यशवंत मनोहर, म. सु. पाटील, बाळकृष्ण कवठेकर यांनी दलित साहित्याची केलेली मीमांसा लक्षणीय ठरणारी आहे. अन्य भाषांमध्येही या साहित्याची चर्चा झाली. हिंदीतील प्रख्यात लेखक कमलेश्वर यांनी 'सारिका' नियतकालिकाचा एक विशेषांक काढला. याबरोबरच गंगाधर पानतावणे यांनी 'अस्मितादर्श' नियतकालिकामधून ही वाङ्मयीन व समीक्षेची चळवळ जिवंत ठेवली, पण वस्तुनिष्ठ पद्धतीने या साहित्याचा विचार झालेला नाही. व्यक्तिनिष्ठ होऊ पाहणाऱ्या मराठी साहित्यातील एकांगी भूमिका बाजूला सारण्याचे व समूहनिष्ठ अभिव्यक्ती करण्याचे काम दलित साहित्य समीक्षेने केले आहे. तथापि, विषम समाजरचना व कलानिर्मिती यांचा खोलवर विचार या समीक्षेने केला नाही. दलित साहित्याने समाजाप्रति बांधिलकीची भावना जपली असली तरी बांधिलकीची तात्त्विक चर्चा दलित समीक्षेत अभावानेच दिसते.

स्त्रीवादी साहित्याचे आकलन स्त्रीवादी समीक्षेने केले आहे. अश्विनी धोंगडे, मंगला वरखेडे यांनी या संदर्भात केलेली मांडणी दिशा देणारी आहे. विद्या बाळ, इंदुमती शेवडे, विद्युत भागवत, सुषमा करोगल, प्रतिभा रानडे, माया पंडित, मंदा खांडगे, सौदामिनी राव, आसावरी काकडे, सुजाता महाजन, शोभा नाईक यांनी केलेले ग्रंथस्वरूपाचे वा नियतकालिकांमधील स्फुट लेखन यातून स्त्रीवादी भूमिकेची समीक्षा शोधता येते. बायजा, मिळून साऱ्याजणी, चारचौघी या मासिकांमधून व नियतकालिकांमधून ही स्त्रीवादी भूमिका मांडली गेली आहे. पुरुषी समीक्षेच्या मापदंडाने स्त्रीवादी भूमिका मांडली गेली आहे. पुरुषी समीक्षेच्या मापदंडाने स्त्रीवादी साहित्याचे मूल्यमापन न करता त्याला स्त्रीवादी साहित्य समीक्षेचे (Feminist Criticism) नियम लावले जावेत, अशा प्रकारचे विचारही मांडले जात आहेत. भारतीय स्त्रीवाद आणि पाश्चात्त्य स्त्रीवाद असे एक विचाराचे द्वंद्वही या समीक्षेत आढळते. ही समीक्षाही परिपूर्ण अवस्थेत नाही, पण जाणीवपूर्वक स्त्रीवादी विचार रुजवण्याचा प्रयत्न लक्षणीय स्वरूपात आढळतो.

आदिवासी, मुस्लिम, ख्रिशन, महानगरी असे काही साहित्यप्रवाह समीक्षेच्या वाटचालीत आढळतात. मराठी समीक्षेचा विचार करताना अधिक-उणे अशा गोष्टी आढळतात. शिवाय समीक्षा ही अखंड चालू असणारी प्रक्रिया आहे. ही वस्तुस्थिती असल्याने समीक्षेत कालानुरूप बदलही संभवतात.

समीक्षेच्या विविध पद्धती आणि त्यांचे उपयोजन हा विचार व्यापक स्वरूपाचा आहे. एखाद्या साहित्यकृतीत असणारी अनुभवाची सामग्री, त्या सामग्रीचे स्वरूप ध्यानात घेऊन विशिष्ट विचारसरणीच्या मदतीने समीक्षा केली जाते. साहित्यकृतीचे स्वरूप व त्यातून प्रकटणारी मूल्ये यांच्या मदतीने समीक्षेचे शब्दांकन होत असते. समीक्षक हा विशिष्ट पद्धतींच्या आधारे हा अभ्यास गरजेनुसार मांडतो. प्रभावी विचारप्रणालींच्या आधारे ही समीक्षा केली जाते. साहित्यकृतींच्या गरजेनुसार समीक्षा केली जाते. सामग्रीचे मूल्यात्मक स्वरूप शोधणे हे समीक्षाशास्त्राचे केंद्रीय कार्य असते. ते होत असले, तरी चांगल्या समीक्षकांची वानवा असणे हा समीक्षा व्यवहारातील कळीचा मुद्दा आहे हे मात्र निश्चित.

◆

**डॉ. सतीश बडवे**
प्राध्यापक व विभागप्रमुख
मराठी भाषा व वाङ्मय विभाग
डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,
औरंगाबाद ४३१००४
चलभाष : ९१५८९९७७९७



भाषण

हरिश्चंद्र थोरात

# मूल्यभानाची सामग्री

मराठी साहित्यविश्वातील प्रदीर्घ इतिहास आणि भरीव कार्य असलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेने त्यांचा अत्यंत प्रतिष्ठेचा असा 'प्रा. रा. श्री. जोग पुरस्कार' माझ्या 'मूल्यभानाची सामग्री' या पुस्तकास दिला आहे. मी परिषदेचा आभारी आहे. तसेच हा पुरस्कार देण्यास कारणीभूत ठरलेल्या पुरस्कार निवड समितीचेही मी आभार मानतो. त्यांनी माझ्या पुस्तकाच्या केलेल्या मूल्यमापनामुळे माझ्यावरील जबाबदारी वाढली असल्याचे भान मला येते आहे. मी मराठीचा विद्यार्थी आहे. त्यामुळेच प्रा. जोग हे केवढे मोठे नाव आहे याची मला कल्पना आहे. प्रा. जोग यांचा संस्कृत साहित्यशास्त्राचा व्यासंग, त्यांनी मराठी साहित्येतिहासाच्या क्षेत्रात केलेले मूलभूत काम, त्यांची मुख्यार्थाची कैफियत, निशिगंध या नावाने त्यांनी लिहिलेली कविता या गोष्टींशी माझा अर्थातच चांगला परिचय आहे. प्रा. जोग यांच्या नावाचा पुरस्कार मिळणे हे मला भूषणास्पद वाटते आहे.

गेली काही वर्षे मी मराठी समीक्षेच्या क्षेत्रात चाचपडतो आहे. मी नेमके काय करतो आहे हे समजून घेण्याचा विचार करतो आहे. चुकणे, सुधारणे, शोधणे, मार्ग बदलणे, मागावर आणि मार्गावर राहणे, हट्टीपणा करणे, अडेलतट्टूपणा करणे, वितंडवाद घालणे, उमगणे, पुन्हा वाचणे यासारख्या अनेक शब्दांच्या साहाय्याने मी आजवर केलेल्या उपक्रमाचे वर्णन करता येईल. मात्र, या स्वतःच्याच उपक्रमावर भाष्य करण्याचा प्रयत्न मी फारसा केला आहे असे म्हणता येणार नाही. आज असा प्रयत्न करून पाहणार आहे. 'मूल्यभानाची सामग्री'बद्दल बोलणे म्हणजे मी गेली काही वर्षे जे करायला धडपडतो आहे त्याचे स्पष्टीकरण करणे होय.

माझ्या एकूण लेखनामागे आणि विशेषतः 'मूल्यभानाची सामग्री' या पुस्तकामागे काही मूलभूत आशयसूत्रे आहेत. त्यांची थोडक्यात मांडणी या पुरस्काराच्या निमित्ताने समयोचित ठरेल असे वाटते. यामधील पहिले आशयसूत्र 'डिमिस्टिफिकेशन ऑफ कॉन्शियसनेस' असे म्हणता येईल. मराठीमध्ये याला 'जाणिवेची रहस्योद्‌घाटनप्रक्रिया' असे म्हणता येईल. मानवी जाणीव ही जाणणाऱ्याला पारदर्शकतेने कळू शकते, या गृहीतकाला नकार देणे येथे अभिप्रेत आहे. लिहिणारा जे म्हणत असतो त्यात त्याच्या इच्छेशिवाय आणि नियंत्रणाशिवाय अनेक गोष्टी घुसत असतात. या अनियंत्रित व्यवहारामधून त्याच्या जाणिवेमध्ये आणि तिच्या आविष्कारामध्ये अपरिहार्य रहस्यमयता निर्माण होत असते. मात्र, ही रहस्यमयता अभेद्य नसते, तिचे अवगुंठन दूर करता येते, असा विश्वास हा 'मूल्यभानाची सामग्री'मधील लेखनाचा एक विशेष आहे. तथापि, रहस्योद्‌घाटनाची ही प्रक्रिया शक्य करण्यासाठी साहित्याच्या क्षेत्राची विशुद्धता आणि वाचन-लेखनाच्या प्रक्रियांच्या अंगोपांगात भिनलेली रोमँटिक दृष्टी, या दोहोंचा त्याग करणे गरजेचे असते. त्याचबरोबर समाज, संस्कृती, कल्पनाप्रणाली, सत्ता या मानवशास्त्रांमधील संकल्पना समीक्षा व्यवहारामध्ये आयात करणे आवश्यक ठरते. या संकल्पना गांभीर्याने वापरायला सुरुवात केली की आपण अत्यंत नेमकेपणाने साहित्यव्यवहाराच्या सीमारेषेवर येऊन उभे राहतो. साहित्यकृती घडवणारे इतिहासाचे प्रमाथी ओघ आपल्याला जाणवू लागतात. समाजाचे चलनवलन साहित्यकृतीच्या शब्दाशब्दांमधून जाणवू लागते. 'मूल्यभानाची सामग्री'मध्ये एकत्र आलेले लेखन विविध प्रतलांवरून मूलतः सामाजिक असलेल्या मानवी जाणिवांचा परामर्श घेते आहे आणि या प्रयत्नात परंपरेने

■

**महाराष्ट्र साहित्य परिषदेने दिलेला प्रा. रा. श्री. जोग पुरस्कार स्वीकारताना केलेले भाषण (दि. २२ फेब्रुवारी २०१७).**

■



गूढ, रहस्यमय, पवित्र ठरवलेल्या गोष्टींवरचा पडदा दूर करते आहे. निदान तसा प्रयत्न करते आहे. अनुभव आणि जगणे यांच्याविषयीची समीक्षेची रूढ भाषा संहितात्मकता आणि सामाजिकता यांविषयीच्या संभाषितापर्यंत घेऊन येणे हे 'मूल्यभानाची सामग्री'चे उद्दिष्ट आहे.

हा प्रयत्न 'मूल्यभानाची सामग्री'ला अपरिहार्यपणे अनेकविद्याशाखीयतेकडे घेऊन जातो आहे. समाजशास्त्र, राज्यशास्त्र, इतिहास, तत्त्वज्ञान, मानवशास्त्र, मनोविश्लेषण आणि अत्यंत व्यापक आणि सैल अर्थाने 'थिअरी', असे अनेकविध मर्मदृष्टींचे आवाज 'मूल्यभानाची सामग्री'मधून ऐकू येतात. याचा अर्थ या सर्व ज्ञानशाखांवर नीट अधिकार मिळवून मग लेखन केले आहे असे नाही. मात्र, आकलन खुंटले की सामग्री कुठे शोधावी हे या पुस्तकाला नीट समजते, असे म्हणता येईल. तसेच या पुस्तकाच्या लेखकाला कुतूहल आहे आणि त्यापोटी अधिकार नसलेल्या क्षेत्रात नाक खुपसण्याची अदम्य इच्छा त्याच्यामध्ये आहे, असेही म्हणता येईल. साहित्यव्यवहाराबद्दल वेगळ्या दिशेने विचार करण्यासाठी चिथावणारे मुद्दे त्याला हवे असतात आणि साहित्यविचाराच्या बरोबरीने ते वेगवेगळ्या विद्याशाखांमधून प्राप्त होतात. तथापि, ही सुरुवात असते. केवळ एक साधन या स्वरूपात या विद्याशाखा राहत नाही, हे स्पष्टच आहे. याच्याही खाणाखुणा 'मूल्यभानाची सामग्री'मध्ये सापडू शकतात.

या पुस्तकाच्या संदर्भात महत्त्वाचे असलेले दुसरे आशयसूत्र 'कोणाला उद्देशून हे सारे चालले आहे' या प्रश्नाशी संबंधित आहे. या प्रश्नाचे सोपे उत्तर, कोणाला म्हणजे काय, वाचकाला उद्देशून हे सारे चालले आहे असे देता येईल. हे फसवे उत्तर आहे. नाटकातले स्वगत स्वतःला उद्देशून बोलले जात आहे असे वाटत असले तरी प्रत्यक्षात ते प्रेक्षकांना उद्देशून असते. 'मूल्यभानाची सामग्री' वाचकांना उद्देशून लिहिले आहे असे वाटत असले, आणि यात काही प्रमाणात तथ्य असले, तरी या पुस्तकाचा खरा श्रोता ज्याला उद्देशून हे लेखन केले आहे तो लेखक आहे. 'मूल्यभानाची सामग्री' लेखकाला उद्देशून लिहिल्या गेलेल्या संहितांचा समूह आहे. मी वाचकाच्या भूमिकेतून लेखकाला उद्देशून हे सारे लिहितो आहे आणि आम्हा दोघांमधला संवाद आमच्या नकळत खराखुरा वाचक ऐकतो आहे. माझा खराखुरा 'पर' लेखक आहे आणि वाचक या संवादस्थळी योगायोगाने उपस्थित झाला आहे. मी प्रसंगी जाणीवपूर्वक चुकीचे अर्थनिर्णयन करण्याची धमकी लेखकाला देतो आहे आणि हेच करण्याचे स्वातंत्र्य वाचकाला बहाल करतो आहे. अर्थात, हे स्वातंत्र्य उपभोगण्याची क्षमता असलेला वाचक 'मूल्यभानाची सामग्री'ला सापडण्याच्या शक्यता खूप धूसर होत चालल्या आहेत; पण हा अगदीच वेगळा प्रश्न आहे. या पुस्तकातील 'समीक्षेची समीक्षा' या भागातील लेखन नजरेखालून घातले तर त्याचे लेखक या संकल्पनेशी असलेले संबंध अधिक नेमकेपणाने स्पष्ट होतात. पुस्तकात आलेल्या साहित्यकृतींच्या विश्लेषणांमध्ये तसेच सैद्धान्तिक चर्चांमध्येही लेखकाच्या संकल्पनेला महत्त्वाचे स्थान आहे. लेखकाचे लेखकत्वासारख्या चर्चेत ते अधिक उघड होते.

लेखक म्हणजे कोणी एक विशिष्ट व्यक्ती नव्हे. उलट, लेखक म्हणजे प्रतिभेची ईश्वरी देणगी लाभलेली अनन्यसाधारण व्यक्ती, या संकल्पनेपासून लेखकाला शक्य तेवढ्या दूर घेऊन जाण्याचा प्रयत्न हा 'मूल्यभानाची सामग्री'मधील लेखनाचा एक विशेष आहे. लेखक या गोष्टीकडे मी एक संस्था म्हणून पाहतो. ही समाजाने निर्माण

केलेली संस्था आहे. येथील संस्थात्मक अवकाश सर्जनाच्या प्रेरणेने भारलेला असतो, असे समाजव्यवस्था सुचवत असते. माझ्या लेखनाचा प्रयत्न व्यवस्थानियंत्रित सर्जनप्रेरणेचा फोलपणा प्रकट करणे हा असतो. लेखकपणाचा हा इमला उलगडताना मला त्याच्या जडणघडणीची सूत्रे समजून घेण्यासाठी अधिक व्यापक स्वरूपाच्या तपशिलात उतरावे लागते. हा तपशील मला समाज व संस्कृती यांसारख्या अत्यंत गुंतागुंतीच्या संरचनांच्या परिशीलनातून प्राप्त होतो. त्यामुळेच वर्ग, जात, लिंगभाव, कल्पनाप्रणाली, सत्ता यांसारख्या संकल्पना या पुस्तकामधील विवेचनात घुसतात आणि लेखकासह साहित्यव्यवहारातील अनेक प्रतिष्ठाप्राप्त मूल्यव्यूहांची विरचना करू लागतात. या पुस्तकातील संस्कृती अभ्यासाची ही एक महत्त्वाची दिशा आहे. या प्रक्रियेमधून लेखक, वाचक, संहिता यांसारख्या संकल्पना उद्ध्वस्त होत नाहीत, तथापि त्यांची व्यापक आधारावर पुनर्रचना होते.



**लिहिणारा जे म्हणत असतो त्यात त्याच्या इच्छेशिवाय आणि नियंत्रणाशिवाय अनेक गोष्टी घुसत असतात. या अनियंत्रित व्यवहारामधून त्याच्या जाणिवेमध्ये आणि तिच्या आविष्कारामध्ये अपरिहार्य रहस्यमयता निर्माण होत असते. मात्र, ही रहस्यमयता अभेद्य नसते,**

'मूल्यभानाची सामग्री' या पुस्तकाला पुरून उरलेले तिसरे आशयसूत्र निरुपयोगीपणाचे आहे. निरुपयोगी हा शब्द अत्यंत जाणीवपूर्वकतेने वापरतो आहे. मला निरर्थक किंवा अर्थशून्य म्हणत तत्त्वज्ञानात्मक व्हायचे नाही. मी दैनंदिन वास्तवाच्या भौतिक पातळीवर उभे राहून निरुपयोगी हा शब्द वापरतो आहे. या पुस्तकाला लिहिलेल्या प्रास्ताविकातही त्यातल्या लेखनाच्या निरुपयोगीपणाचा मी उल्लेख केला आहे. तेथे मी लिहिले आहे, 'साहित्याभ्यासाविषयीची आजची महाराष्ट्रातील आणि मराठीतील परिस्थिती पाहता या प्रकारचे लेखन कितपत वाचले जाईल याविषयी माझ्या मनात खूप शंका आहेत. वाचले जाण्यासाठी लेखकाने वाचकांच्या सांस्कृतिक अस्मितांना कुरवाळणे आज गरजेचे ठरते आहे. वाचकांना धडपडायला न लावता, अभ्यासाकडे न वळवता, जमेल तेवढे सुलभीकरण करण्याच्या प्रवृत्तीचा आणि लेखन वाचले जाण्याचा संबंध असतो, अशी तक्रार करायलाही जागा आहे. महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय पातळींवरील परीक्षांमध्ये येणाऱ्या प्रश्नांची उत्तरे लिहिण्यासाठी आवश्यक ठरेल असे लेखनही वाचले जाण्याची शक्यता असते. 'मूल्यभानाची सामग्री'मध्ये समाविष्ट झालेले लेखन अशा पद्धतीने वाचकांचा अनुनय करणारे नसल्यामुळे त्यामध्ये उपयुक्तता आणि वाचनानुकूलता विशेष नाही, हे मान्यच आहे. उपयुक्त नसलेल्या गोष्टी करण्यातली मूल्ययुक्तता मला विशेष भावत असल्यामुळेच या लेखसंग्रहाचे शीर्षक 'निरुपयोगी निबंध' असे ठेवावे, असा आग्रह आमच्या प्रकाशकमित्रांकडे मी धरला होता. तो त्यांना मान्य झाला नाही.' असो.

निरुपयोगी असणे ही कल्पना आपण जरा अधिक पुढे नेऊया. विशिष्ट व्यवहारक्षेत्रातील उपयोगीपणा आणि निरुपयोगीपणा कसा ठरतो? तर या व्यवहारक्षेत्राकडे व्यवस्था कोणत्या दृष्टिकोनातून पाहते यावर हे ठरते. उदाहरणार्थ, शेतीचे क्षेत्र घ्या. साहित्यासारखेच ते सर्जनाशी संबंधित आहे. या क्षेत्रामध्ये रासायनिक खते उपयोगी की निरुपयोगी? व्यवस्थेचा एकूण दृष्टिकोन पाहता ही भलतीच उपयोगी वाटतात. असंख्य शेतकरी ती व्यवस्थेला हवी आहेत म्हणून वापरतात. व्यवस्थाही काही केवळ गुन्हेगार नसते. तिचा असा सुसंगत तर्क असतो. तिच्या व्यवहारामागेही काही प्रभावी तत्त्वे असतात. या तत्त्वांच्या दबावाखाली यायचे नसेल तर व्यवस्थेने निरुपयोगी म्हणून शिक्का मारलेल्या गोष्टी इमाने इतबारे करीत राहणे गरजेचे असते. लोकप्रिय ठरेल असे चुरचुरीत लेखन न करणे, जड वाटले तरी आकलनाशी प्रामाणिक राहणारेच लिहिणे, आत्मचिकित्सेचा व्यासंग करीत राहणे, उथळ सांस्कृतिक राजकारणाच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न करीत राहणे आणि शक्य तेवढे परखड आणि खरे लिहिणे यांसारख्या व्यवहारांमधून व्यवस्थेला निरुपयोगी असणाऱ्या लेखनाच्या कृती निर्माण होतात. या कृती करीत व्यवस्थेला निदान सौम्य स्वरूपाचा आणि बौद्धिक पातळीवरचा नकार देण्याचा प्रयत्न 'मूल्यभानाची सामग्री' करते आहे, असे मला नम्रपणे सुचवावेसे वाटते.

हे पुरेसे आहे असे नाही. माझ्या मर्यादित क्षमतांद्वारे एवढे शक्य आहे असे वाटते.

◆

**हरिश्चंद्र थोरात**
चलभाष : ९८१९०९४२३६



अनुक्रमणिका








निमित्ताने

नंदकुमार मोरे

# आसाराम लोमटे यांची कथा खेड्यांच्या उजाडीकरणाची कर्मकहाणी



शोषित, अभावग्रस्त माणसाचं जगणं, त्याचे भावविश्व आणि मानवी नातेसंबंधांविषयी ते कमालीच्या आत्मियतेने आणि आस्थेने लिहितात. लोमटे ज्या माणसाविषयी लिहितात त्याच्या जीवनाविषयी त्यांच्या मनात आंतरिक ओढ आहे. त्यामुळे या माणसाविषयी लोमटेंच्या मनात सश्रद्धभाव,कळवळा आणि आंतरिक ओल आहे. या अर्थाने त्यांच्या कथेचे नाते संतांच्या सहृदयतेशी आहे.

आसाराम लोमटे हे समकालीन मराठी साहित्यातील आश्वासक नाव आहे. त्यांच्या आलोक (२०१०) कथासंग्रहाला प्राप्त झालेल्या या वर्षीच्या साहित्य अकादमी पुरस्कारानेही हे सिद्ध केले आहे. आलोक हा लोमटे यांचा अनुक्रमे दुसरा कथासंग्रह. त्याआधीचा इडा पिडा टळो (२००६) हा सहा कथांचा समावेश असलेला कथासंग्रह त्यांच्या नावावर आहे. याशिवाय इतरत्र त्यांच्या काही कथा आणि नुकताच धूळपेर (२०१७) हा ललित लेखसंग्रह प्रकाशित झाला आहे. त्यांच्या कथालेखनाचे सामर्थ्य 'इडा पिडा टळो' या पहिल्याच कथासंग्रहाने सिद्ध केले होते. पंधरा-सोळा वर्षांच्या लेखनप्रवासात अल्प परंतु, अतिशय गंभीर लिहून लोमटे यांनी आपले वेगळेपण सिद्ध केले आहे. त्यांची लेखनाविषयीची निश्चित भूमिका पाहता, अशी भूमिका घेणाऱ्या आणि गंभीर भान असलेल्या आजच्या मोजक्या लेखकांमध्ये लोमटे यांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल. शोषित-अभावग्रस्त माणसाचे जगण, त्याचे भावविश्व आणि मानवी नातेसंबंधांविषयी ते कमालीच्या आत्मीयतेने आणि आस्थेने लिहितात. लोमटे ज्या माणसाविषयी लिहितात त्याच्या जीवनाविषयी त्यांच्या मनात आंतरिक ओढ आहे. त्यामुळे या माणसाविषयी लोमटे यांच्या मनात सश्रद्धभाव, कळवळा आणि आंतरिक ओल आहे. या अर्थाने त्यांच्या कथेचे नाते संतांच्या सहृदयतेशी आहे. साहित्य अकादमी पुरस्काराची परंपरा पाहता, कथेला हा पुरस्कार दुर्मीळ झाला होता. याला काही कारणेही आहेत. परंतु, नजीकच्या काळात कथेला मिळालेला हा दुसरा पुरस्कार आहे. फिनिक्सच्या राखेतून उठला मोर (२०१०) या जयंत पवार यांच्या संग्रहाने कथेला सर्वप्रथम हा सन्मान मिळवून दिला. एवढेच नाही, तर त्यांच्या कथेने कथेविषयीच नव्याने विचार करायला भाग पाडले आणि आता आसाराम लोमटे यांनी यावर शिक्कामोर्तब केले. मराठी कथा आशय, रूपबंध, भाषा अशा सर्व बाजूंनी बदलत असल्याचे हे सूचन आहे.

आसाराम लोमटे यांच्या कथालेखनाच्या परिघात कोणता माणूस आहे? या प्रश्नाचा शोध घेतल्यास त्यांच्या कथालेखनामागील प्रेरणा लक्षात येते. बदलता काळ ज्यांच्यावर उलटला आहे, काळाच्या दाबाने ज्यांच्या अस्तित्वाचाच प्रश्न निर्माण झालेला आहे अशा माणसाचे जगणे हा लोमटे यांच्या कथेचा आणि चिंतनाचा विषय आहे. दिवसागणिक वाढत चाललेल्या प्रश्नांचे गंभीर भान त्यांची कथा व्यक्त करते. या प्रश्नांची गुंतागुंत उलगडू पाहणारा भरगच्च तपशील, ठसठशीत व्यक्तिरेखा, अस्सल मराठवाडी भाषेतून

पाझरणारा जीवनाशय आणि शोषितांच्या प्रश्नाला थेटपणे भिडण्याची विलक्षण क्षमता लोमटे यांच्या कथेमध्ये दिसते. मराठीतील पारंपरिक ग्रामीण कथा तिच्यातील साचेबद्धपणा, रंजकता, खटकेबाज संवाद, किस्से आणि यामधून केला जाणारा वाचकांचा अनुनय यामध्येच अडकून पडली होती. या आवर्तातून मराठी कथेला बाहेर काढण्यामध्ये आसाराम लोमटे यांच्या कथेने महत्त्वाचे काम केले आहे. तथापि, आसाराम लोमटे यांच्या कथेची पार्श्वभूमी आणि तपशील ग्रामीण परिसरातील असला तरी त्यांच्या कथेला ग्रामीण या परिभाषेत अडकवता येत नाही. साहित्याचे केंद्रच आज ग्रामीण भागाकडे सरकले असल्याने वेगवेगळ्या प्रदेशांतून लिहिले जाणारे साहित्यच आजचे साहित्य आहे. या साहित्याला कोणत्याही सीमारेषेत अथवा चौकटीत बंदिस्त करणे सयुक्तिक होणार नाही. लोमटे यांच्या लेखनाच्या परिघात बदलते ग्रामवास्तव येत असल्याने ती व्यापक जीवनदर्शन घडवणारी आजची मराठी कथा आहे.

■

लोमटे यांच्या कथांची चर्चा त्यांच्या 'इडा पिडा टळो'मधील कथांपासून करू. या संग्रहातील पहिल्याच 'बेइमान'कथेमध्ये राही या कष्टाळू, समजुतदार शेतकरी स्त्रीच्या निरागस प्रेमाशी आणि निष्ठेशी तिच्या पतीने केलेली प्रतारणा हृदय पिळवटून टाकणारी आहे. ही कथा वाचकाला अंतर्बाह्य अस्वस्थ करते. राहीशी बेइमानी करण्यामागे गावचे बदलते राजकीय वास्तव आहे. दोन-तीन घरांमधला सत्तासंघर्ष, वचपा, संस्कृतीतले सूडबद्धी राजकारण, आयडियालॉजी नसलेले नेते, त्यांच्यामागून वाहवत चाललेले कार्यकर्ते, त्यांची डोकी सतत गरम ठेवणारी यंत्रणा, प्रतिष्ठेच्या भ्रामक कल्पना, दिखाऊगिरीमुळे वाढलेला वाह्यातपणा, त्यातून भगीरथसारख्या गरिबांचे वाहवत जाणे आणि अंतिमत: स्वत:च्या संसारात माती कालवून घेणे, हेच गावातील राजकारणाचे वर्तमान वास्तव आहे.

या कथेत सदाकाकाचा दबाव आणि मनात अंकुरलेल्या सरपंचपदाच्या लालसेने भगीरथ स्वत:सह सर्वांची घोर फसवणूक करतो. या फसवणुकीत आजन्म पुसला जाणार नाही असा व्रण मनावर ओढून घेतो. या व्रणाची लसलस संवेदनशील मनाचा तळठाव घेणारी आहे. या कथेतील सदाकाका ही राजकारण बदनाम करणारी एक प्रवृत्ती गावोगावी दिसते. तिनेच राजकारणाची दलदल केली आहे. स्वत:च्या स्वार्थापोटी भगीरथसारख्या सरळमार्गी माणसाचा ही प्रवृत्ती बळी घेते. एकीकडे पाऊस नाही. दुबार पेरणीचे संकट ओढवले आहे. पेरलेले उगवत नाही, तर दुसरीकडे भगीरथसारखे तरुण उगवलेले उखडायला निघाले आहेत. दोन मुलींनंतर मुलाच्या आशेने राहीच्या मनात अंकुरलेला मोहर उखडून टाकला जातो. तिची मोहरलेली कूस बेइमानीने रिती केली जाते. ही भगीरथच्या जीवनातील मोठी शोकांतिका आहे. कथेच्या शेवटी भगीरथचा भावविवश स्थितीत राहीविषयी जो विचार चालला आहे त्यातून राहीची एक 'लार्जर दॅन लाइफ' अशी प्रतिमा तयार होते. राहीचे संसाराला जुंपलेपण, 'वाळलेल्या सरपणासारखी दिसायची...एखाद्या लाकडाला साडी गुंडाळल्यासारखं वाटायचं' या वर्णनाने ती ठसठशीतपणे समोर येते. तिचा गर्भपातासाठी सर्वतोपरी केलेला विरोध संपल्यानंतर भगीरथवरील प्रेम आणि मुलगा झाला तर ठेवू आणि मुलगी असली तर पाडू, या बोलीवर गर्भ पाडायला तयार होते. या प्रसंगात ती गरीब गाईसारखी फरफटते. तिची निरागसता मनाचा थरकाप करते. गर्भ पाडल्यानंतर तुम्हाला मुलगा होणार होता, या शब्दांनी भगीरथला कड्यावरून ढकलून दिल्याचा भास होतो. मन पापभयाने दाटून येते. त्याची भावस्थिती स्वत:ला आपल्या हातानी अंधारयुगात लोटल्यासारखी होते आणि अंतिमत: राही, भगीरथसारख्या गरीब, सामान्य शेतकऱ्याला या गर्तेत ढकलणाऱ्या प्रवृत्तीविषयी मनात प्रचंड चीड निर्माण होते.

लोमट्यांच्या कथेतील जीवनाशयाचा पैस विस्तृत असून, स्वत:चा चेहरा आणि आवाज नसलेला पीडित माणूस त्यांच्या कथेच्या केंद्रस्थानी आहे. 'जिनगानीचा जाळ' ही अशाच पीडित कुटुंबाची कथा आहे. कृषी विद्यापीठात हंगामी मजूर असलेल्या प्रयागबाईच्या कुटुंबाची परवड आणि चळवळीत शिरलेल्या रक्तपिपासू प्रवृत्तींविषयीची ही कथा आहे. या कथेमध्ये रोजंदारी कर्मचाऱ्यांच्या मोर्चात सहभागी झालेल्या प्रयागबाईच्या डोक्याला गोळी लागून तिचा बळी जातो. प्रथम जिवंत असताना आणि मेल्यानंतरही तिच्या प्रेताचा वापर स्वार्थासाठी कसा होतो याचे हृदयद्रावक चित्र येते. प्रयागबाईच्या पश्चात तिचा मुलगा मच्छिंद्र आणि नवऱ्याच्या जाचाला बळी पडलेली मुलगी देवकी यांची ससेहोलपट येथील चळवळी आणि व्यवस्थेविषयी अनेक प्रश्न उभे करते. प्रयागबाईची मुले उपाशी तडपडत असताना चळवळीतील नेते तिचा पुतळा उभा करून राजकारण करताहेत. मजुरांच्या वर्गणीतून स्वत:ची पोळी भाजून घेताहेत. जीवन अक्षरश: धकवणाऱ्या सामान्य गरिबांचे

शोषण आणि शोषकांच्या क्रूर मानसिकतेचे दर्शन ही कथा घडवते.

आसाराम लोमटे यांच्या कथेला गावातील राजकारणाचा व्यापक संदर्भ आहे. त्यांची कथा या राजकीय पृष्ठभूमीवरच उभी राहते. गावात राजकारण हा खेळ, तर सूड, बदला, वचपा ही या खेळाची भाषा झाली आहे. आजचे गाव उद्ध्वस्त होण्यास हा खेळच कारणीभूत आहे. या राजकारणात जन्मलेल्या प्रवृत्ती, नीतिमूल्ये आणि तत्त्वांना दिलेली मूठमाती, तेथील अस्थिरतेतून माणसाच्या अस्तित्वावरच उठलेल्या अनेक गोष्टी लोमटेंच्या कथांमधून येतात. 'निचरा' कथेतील तात्यासाहेब शिंगाडे ही अशीच राजकारणात जन्मलेली एक प्रवृत्ती आहे. केवळ पैशाच्या बळावर काँग्रेसचे तिकीट मिळवलेले तात्यासाहेब आमदार होतात. तळातून आणि संघर्षातून उभे राहिलेले नेतृत्व जनतेशी एक नाते ठेवून असते. तसे तात्यासाहेबांचे दिसत नाही. त्यांना जनतेशीच काही देणे-घेणे नाही. वडिलांचा हट्ट, पैसा यामुळे केलेल्या प्रयत्नांना यश म्हणून काँग्रेसचे तिकीट आणि पुढे आमदारकी लाभते. त्यामुळे ते सत्तेच्या कैफात माणसे तोडत जातात. घरच्यांसह सगळ्यांवरच आपला स्वभाव लादतात आणि उन्मत्तपणे जगतात. 'चालत्या काळात मुताचे दिवे पाजळलेल्या' तात्यांवर काळच उलटतो, सूड घेतो. पोटचा मुलगाच त्यांना एकाकी पाडतो. तात्यासाहेबांना पडणारी दु:स्वप्ने आणि किसनरावांसमोरील त्यांचे असंबद्ध बडबडणे बरेच सूचक आहे. उन्मत्तपणे जगलेले दिवस, त्यांनी कुरतडलेली मने आणि त्यातून दिसणारी तात्यासाहेबांच्या स्वभावाची क्रूरता हे जीवनातील एक वास्तव आहे.

सहकाराने झालेल्या विकासाच्या मोठमोठ्या गप्पा राजकीय व्यासपीठांवर मारल्या जातात, परंतु या विकासाच्या तळाला जळत असलेले गरिबांचे संसार मात्र कोणाला दिसत नाहीत. महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखाने आणि त्यामधून केले जाणारे राजकारण मराठी साहित्यामध्ये अपवादानेच आलेले आहे. त्यामुळे हे वास्तव सांगणारी या संग्रहातील 'चरक' ही कथा फार महत्त्वाची आहे. ही कथा नागनाथ आणि त्याच्यासारख्या असंख्य अल्पभूधारक शेतकऱ्यांची शोकांतिका आहे. सहकारी साखर कारखान्याच्या माध्यमातून चालणारे गलिच्छ राजकारण या कथेच्या केंद्रस्थानी आहे. अनेक साखर कारखाने आज राजकारणाचे बळी ठरले आहेत. शेतकऱ्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी सुरू केलेल्या अशा अनेक कारखान्यांचा सध्या लिलाव चालला आहे. तेथील रसातळाला गेलेले राजकारण आणि भ्रष्ट व्यवहार हे यामागचे कारण आहे. सरकारी अनुदानावर चरणारे कारखान्यांचे चालक स्वार्थासाठी कोणत्याही थराला जाताना दिसतात. या कथेत साखर कारखान्याचे चेअरमन असलेले नारायण फड हे सेनेचे आमदार आहेत. ते स्वत:ला मतदान न केल्याच्या रागातून नागनाथच्या गावावर सूड उगवताहेत. त्याचाच भाग म्हणून या गावातील ऊस उचलायला टाळाटाळ चाललीय. तो जाग्याला वाळून चाललाय. गावातील धनिक अनेक मार्गांनी आपला ऊस कारखान्यापर्यंत पोहोचवतात. त्यामध्ये ऊसतोड कामगारांपासून स्लिपबॉयपर्यंत सारेच हात धुऊन घेताहेत. नागनाथसारख्या शेतकऱ्याचे ऊस उचलण्यासाठी होणारे शोषण कारखान्याच्या कारभाऱ्यांचे आणि सहकारात जन्मलेल्या प्रवृत्तींचे उघडेवाघडे चित्र आहे. येथील व्यवस्था नागनाथला होरपळून टाकते. एवढेच नाही, या होरपळीत त्याचे जीवनच संपून जाते. ही एकप्रकारे अल्पभूधारक शेतकऱ्याची शेतकरीपुत्रांनीच



**आसाराम लोमटे यांच्या कथेला गावातील राजकारणाचा व्यापक संदर्भ आहे. त्यांची कथा या राजकीय पृष्ठभूमीवरच उभी राहते. गावात राजकारण हा खेळ, तर सूड, बदला, वचपा ही या खेळाची भाषा झाली आहे. आजचे गाव उद्ध्वस्त होण्यास हा खेळच कारणीभूत आहे. या राजकारणात जन्मलेल्या प्रवृत्ती, नीतिमूल्ये आणि तत्त्वांना दिलेली मूठमाती, तेथील अस्थिरतेतून माणसाच्या अस्तित्वावरच उठलेल्या अनेक गोष्टी लोमटेंच्या कथांमधून येतात.**

केलेली हत्या आहे. तर दुसरीकडे चार-सहा महिन्यांपासून कामगारांचा पगार थकलेला असतानाही टक्केवारीसाठी शासनाकडून मिळालेली रक्कम गुत्तेदारांचे देणे देण्यासाठी वापरली जाते. त्यामध्ये कामगार पेटून उठतात. आंदोलनाचा भाग म्हणून कलेक्टरला निवेदन देऊन कारखाना बंद पाडतात. कारखाना बंद पडल्याचे आमदाराला काही वाटत नाही. उलट, कामगारांची जिरवल्याचा खुनशी आनंद त्याला होतो. शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी स्थापलेल्या संस्थांमधूनच शेतकऱ्याला संपवण्याची कटकारस्थाने कशी शिजतात आणि तेथील पराकोटीच्या राजकारणात सारेच कसे भरडतात याची ही कथा आहे.

शेतकऱ्यांचे प्रश्न रोज नवे रूप घेताहेत. शेतीमालाच्या हमीभावाविषयीचा प्रश्न सरकारने थट्टेचा विषय केला आहे. मागणी आणि उत्पादन यांचा मेळ लागत नसल्याने हमीभाव हा शेतकऱ्यांपुढचा यक्षप्रश्न आहे. त्यामुळे अलीकडच्या काही वर्षांमध्ये हमीभावासाठीच्या आंदोलनांनी महाराष्ट्र ढवळून निघाला आहे. या आंदोलनाच्या यशापयशापेक्षा ही आंदोलने ज्यांनी उभी केली, त्यांच्या निःस्पृहतेची, लढाऊ वृत्तीची आणि कृषिकर्मावरील निष्ठेची 'इडा पिडा टळो' ही कथा आहे. सीताबाई ही शेतकरी स्त्री कापसाच्या हमीभावासाठी चाललेल्या आंदोलनात भाग घेते, नेतृत्व करते. सीताबाई ही अल्पभूधारक शेतकरी आहे. आपल्यासारख्या शेतकऱ्यांविषयी तिला कळकळ आहे; म्हणून ती 'चुलीचं लाकूड कऱ्हरक चुलीत घालायचं? आता सरकारच्या पाठीतबी बसायला पाह्यजी' अशी भूमिका घेते. तिच्यासारख्यांची शेती आणि शेतकऱ्यांविषयीची बांधिलकी हेच चळवळीचे बलस्थान आहे. ऐन दिवाळीत आंदोलन पेटले असल्याने सणापेक्षा ती आंदोलनासाठी झटताना दिसते. एकीकडे आंदोलनाची धावपळ आणि दुसरीकडे भाऊ बिभीषणचे सणासाठी माहेरी येण्यासाठीचे आर्जव यामध्ये ती सण बाजूला ठेवते. माहेरी वडील अंथरुणाला खिळले आहेत. त्यांचे कधीही बरेबाईट होऊ शकते. त्यामुळे चार भावंडांत एकटी, म्हणून लाडकी असलेल्या सीताबाईच्या नावावर दहा एकर रान ते देणार आहेत. त्यासाठी भाऊ घाई करतोय; परंतु तिला वडिलांच्या जमिनीचा मोह नाही. त्यापेक्षा तिला आपल्यासारख्या लाखो शेतकऱ्यांचा प्रश्न मोठा वाटतो. ती वाट्याला आलेले जीवन निष्ठेने आणि चिकाटीने जगू पाहणारी हिम्मतबाज स्त्री आहे. समर्पण भावनेने ती आंदोलनात उतरली आहे. स्वार्थापुढे नातेसंबंध संपत चाललेल्या काळात वडील देऊ करीत असलेल्या जमिनीचा मोह टाळून ती जीवनाचा मथितार्थच शोधते. जीवनाला अर्थ देणाऱ्या नातेसंबधांचा धागा अतूट राखण्यासाठी संयम आणि त्यागाचे दर्शन घडवते. वास्तविक, भारतीय कुटुंबाव्यवस्थेत स्त्री हीच नाती एकत्र बांधणारी दोरी आहे. ती तुटली की सारे विखरून जाते, याचे भान ही कथा देते.

खेड्याला आतून पोखरणाऱ्या प्रवृत्तींचे दर्शन हा लोमट्यांच्या कथेचा विशेष आहे. 'होरपळ' कथेमध्ये निवेदक 'गावचं राजकारण चुलांगणावर चढलंय' असे म्हणतो; कारण तेथील राजकारणाने सामान्यांचा कडेलोटच आरंभला आहे. या कथेला गावातील दलित-सवर्ण संघर्षाची पार्श्वभूमी आहे. गुण्यागोविंदाने नांदणाऱ्या गावात सरपंचपद हिरावून घेतल्याने अस्वस्थ झालेल्या नानाने विष कालवायला सुरुवात केली आहे. असे हजारो नाना आज गावं उजाड करीत निघाले आहेत. आपल्या समोरच्या 'आळपण्यायनं' सरपंच म्हणून मिरवणे नानाला सहन होत नाही. गावकऱ्यांनी आपले सरपंचपद हिरावून घेतल्याची सल नानाला आतून टोचते आहे. यासाठी तो गावावरच सूड उगवायला निघाला आहे. अनेक वर्षांची गावातील सत्ता शिवसेनेच्या तरुण पोरांनी उलथवून टाकल्यानंतर नाना बुधवाड्यातील हरीला हाताशी धरून गावात आंबेडकरांचा पुतळा बसवण्याचे खूळ डोक्यात घालतो. नाला बांधण्यासाठी आलेल्या सिमेंटच्या थैल्या नानाने दाबून ठेवलेल्या असतात, त्या पुतळ्याचा चबुतरा बांधण्यासाठी त्यांना देऊन टाकतो. ग्रामपंचायतीतील भ्रष्ट व्यवहाराचे दर्शन या कृतीतून घडते. आंबेडकरांचा पुतळा गावात बसणार या कल्पनेनेच गाव पिसाळलेले आहे. सेनेची मुले आमदारांच्या सल्ल्याने नानाचा डावच उलथवून टाकतात. मात्र, या कुरघोडीच्या खेळात जगण्याचेच वांधे असलेल्या बुधवाड्यातील लोकांची अन्नानदशा होते. पुतळा बसवण्याच्या निमित्ताने अनेक गोष्टींवर प्रकाश टाकला जातो. पँथरचा चित्ता आणि सेनेचा वाघ परस्परांवर गुरगुरण्याचा सामाजिक संदर्भ, बदलते जातवास्तव हे नव्या राजकीय समीकरणाची नांदी आहे. पुतळ्याच्या निमित्ताने दलित आणि सवर्ण दोन्ही समाजाची आणि नेत्यांची मानसिकता दिसून येते. राजकीय पक्षांकडूनच जातीय अस्मितेला खतपाणी घातले जात असल्याचे वर्तमान



अनुक्रमणिका

आपल्या आजूबाजूला आहे. गावागावांत चाललेला जातीय आणि राजकीय सत्तासंघर्ष आज ज्या स्तराला पोहोचला आहे, त्यामागे आमदार आणि नानांसारख्या प्रवृत्ती कार्यरत आहेत. या संघर्षाने गावचे ऐक्य आणि स्वास्थ्य हरवले आहे. गावांमध्येही परस्परांवरचा विश्वास संपून संशयाचे ढग तरंगू लागले आहेत. लोक जातीच्या छत्रीखाली एकवटताहेत. त्यामुळे ही कथा जातीपातींपलीकडे जपलेला समूहभाव आणि सहानुभाव गावातून हद्दपार झाल्याचे वर्तमान अधोरेखित करते.

खेड्यांचे चाललेले उजाडीकरण हा लोमट्यांच्या चिंतनाचाच विषय आहे. मातीने सारवून स्वच्छ केलेली भिंत कोणीतरी उखरून टाकावी तसे आजच्या खेड्याचे वर्तमान आहे. हे लोमट्यांच्या कथेतून येणारे वर्तमान मन सुन्न करून सोडते. गावावर वरवंटा फिरवणारी यंत्रणा सध्या राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय स्तरावरून काम करतेय. त्यामुळे उद्‌ध्वस्तीकरणाची प्रक्रिया बरीच गतिमान झालेली आहे. या उद्‌ध्वस्तीकरणात चोहो बाजूंनी नाडवलेल्या गरीब, दुबळ्या, अभावग्रस्त लोकांचा आकांत लोमट्यांच्या कथेत ऐकू येतो. खेड्यातच शोषक आणि शोषित असे गट तयार झाले आहेत. शोषितांची संख्या मोठी असूनही नानाविध कारणांनी त्यांची फरफट चालली आहे. यापूर्वीच्या कथासाहित्यातील गाव किंवा खेड्याचे चित्र कल्पनारम्य आणि मोहक होते. वास्तविक नैसर्गिक समृद्धता सोडली तर तेथील बहुतांश समाज हा सतत अभावग्रस्तच होता. पारंपरिक खेड्यातही शोषणाची एक व्यवस्था होतीच, परंतु ती साहित्याच्या पटलावर कधीच इतक्या सामर्थ्याने आली नव्हती.

■

त्यांच्या 'आलोक'मधील कथाही उद्‌ध्वस्ततेच्या उंबरठ्यावरील खेड्याचे विविधांगी वास्तव रेखाटते. गावातील प्रवृत्तींच्या वर्तनव्यवहाराचा शोध घेण्यात लोमट्यांची लेखणी गुंतलेली दिसते. पहिल्याच 'चिरेबंद' या कथेत एकीकडे स्वार्थ, संपत्तीचा मोह, लालसा, दांडगाई, कपट, पिळवणूक अशा वृत्तींचे आणि दुसरीकडे संवेदनशील मनाचे, या मनाने जपलेल्या उच्चतम नैतिकचे दर्शन घडते. प्रसादचे आजोबा हैद्राबाद मुक्तिसंग्रामाच्या लढ्यात हुतात्मा झाले आहेत. त्यामुळे हुतात्मादिनाचे औचित्य साधून शासनाने हुतात्मा पत्नींचा विशेष गौरव ठेवला आहे. त्या सोहळ्याला जाण्यासाठी आजीला सोबत म्हणून प्रसाद गावी आला आहे. ही कथा म्हणजे गावी आलेल्या प्रसादच्या आजोबाच्या कार्यकर्तृत्वाचे प्रथमपुरुषी शोधकथन आहे.

प्रसादच्या मनात आजोबांच्या कार्यकर्तृत्वाविषयीची एक चांगली प्रतिमा आहे. त्यामुळे गावात येताच समोर येणाऱ्या वास्तवाने त्याच्या मनातील प्रतिमेच्या ठिकऱ्या उडू लागतात, धक्के बसतात. तो आतून हादरतो. त्याच्या मनातील आजोबांची प्रतिमा विरायला लागते आणि त्या ठिकाणी नवी प्रतिमा आकारते. आजोबांनी कपट आणि दांडगाईने मिळवलेल्या जमीनजुमल्यावरील त्याचे मन उडून जाते. 'हे पंतांचे नातू' अशी गड्याने ओळख करून देताच प्रश्न विचारणाऱ्याच्या नजरेत दिसलेली डूख आणि 'आता हे वारस समजा ओसाड जहागिरीचे!', 'कशाला येतोस बाबा इकडं, नुस्ता फुपाटाय... सगळ्या आयुष्याची पायपोळ व्हायची. जमिनीची तहान पंतालाही होती...पण जिवापेक्षा भारी असून काय कामाची?... त्यात पुन्हा तुमच्या जमिनी तशा... काटकिंजाळ केकताडात कशाला घालायचा हात?' या बोलण्याचा अर्थ त्याला गावातील अल्प मुक्कामात लागत जातो. आजोबांच्या मृत्यूच्या खऱ्या कारणाचा उलगडा होतो. आपल्या कुटुंबाविषयीच्या नव्या वास्तवदर्शनाने तो पुरता बैचेन होतो, आतून कोलमडतो. पंतांचा मृत्यू हा जमिनीच्या लालसेत झालेला खून आहे. आणि सारी संपत्ती त्यांनी गोरगरिबांना फसवून, कपटाने ओरबडलेली आहे. अनेकांना जीवनातून उठवले आहे. या नव्या वास्तवाने प्रसाद आत्मचिंतनात बुडून जातो. तो वाड्यातील प्रत्येक गोष्टीकडे संशयाने पाहतो. त्याचे मन गाव, वाड्यावरून उडून जाते. वाड्यातून कधी बाहेर पडू असे त्याला होते. फोटोतील पंतांची नजरही त्याला सलते. ही शोषकांच्या विकृत लालसेची आणि शोषितांच्या हतबलतेचीच कथा आहे.

मानवी मन हा न संपणारा शोध आहे. तो प्रत्येक काळातील लेखकांकडून घेतला जातो. मानवी नातेसंबंधांची वीण उलगडणे, नात्याच्या गुंत्यामध्ये अडकलेल्या मनाचा शोध हा नेहमी आव्हानात्मक असतो. आसाराम लोमटे हा शोध सामर्थ्याने घेताना दिसतात. या संग्रहातील 'ओझं' ही नातेसंबंधातील गुंतावळीची कथा आहे. ती या गुंतावळीतून येणारा आणि अस्वस्थ करणारा अनुभव देते. दोन भावांचा परस्परांवर जीव आहे. तरीही त्यांच्यामधील वाढते अंतर वेदना देते. दोघांत पडलेल्या अंतराची सल खूप वेगळी आहे. ती सहजासहजी उलगडता येणारी नाही. तिचा उलगडा न होण्यातच या सलीची

दाहकता आणि तशी ठसवण्यात कथेचे यश आहे. बदलता काळच नातेसंबंधांना तडे देतो आहे. गुंता वाढवतो आहे. मोठा भाऊ शेतीत आणि लहान प्राध्यापक. प्राध्यापक शेतकरी भावाला सर्वतोपरी मदत करतो आहे. तरीही मोठ्या भावाचे मन तुटत चालले आहे. मराठवाड्याची दुष्काळी शेती देत असलेले चटके आणि एकुलती लेक चतुराची चिंता. ती लहान भावाजवळ शहरात शिकावी ही तीव्र इच्छा. दुबार पेरणी, फायनान्स कंपनीचे कर्ज, दारूचे व्यसन अशा अनेक गोष्टींच्या गर्तेत तो स्वतःला संपवतो. या कथेचा प्रारंभ त्याच्या जाण्याने होतो. गेलेल्या भावाशी लहान भावाने केलेला संवाद, असे रचनातंत्र वापरून लोमटयांनी एक अस्वस्थ करणारा अनुभव या कथेतून दिला आहे. भूतकाळातील दोघांचे सहजीवन, एकमेकांविषयीची ओढ वाचकाचे मन सुन्न करते. अपेक्षांचे ओझे साऱ्यांनाच पेलवत नाही. या ओझ्याखाली दबलेल्या मनाची तगमग ही कथा शब्दबद्ध करते. वहिनीच्या रूपाने स्त्रीच्या धीरोदात्त मनाचे दर्शनही येथे घडते. पतीच्या माघारी अशा लाखो स्त्रिया आज नेटाने संसार सांभाळताहेत. त्या एका क्षणी एवढ्या खंबीर होतात की त्यांच्या आजूबाजूचे लोक स्तिमित होऊन जातात. या स्त्रियांचे जीवन 'धारांत वाहून जाण्याची वेळ आली असताना काठावर येण्यासाठीचा आटापिटा' असतो. त्यांचा हा आटापिटाच मानवी जीवन अर्थपूर्ण करतो.

'आलोक'मधील या पहिल्या दोन कथा वगळता उर्वरित चारही कथांना वर्तमान राजकारणाचा व्यापक संदर्भ आहे. गतिमान राजकारणातील गोष्टींचा शोध न संपणारा आहे. पक्षांतरासारखी गोष्टही सध्या एक राजकीय व्यवहार बनला आहे. रात्रीत पक्ष बदलून नवा घरोबा करणारे नेते, कार्यकर्ते आणि पक्षांनादेखील काही तत्त्वं आणि विचारसरणी आहे, असे आजचे चित्र नाही. ना विचार ना ध्येयधोरणे. केवळ सत्ता आणि त्यातून मिळवली जाणारी संपत्ती, हेच आजच्या राजकारणाचे वास्तव आहे. अर्थात याला अपवादही आहेत. 'खुंदळण' या कथेमध्ये आयुष्यभर डाव्या विचारांशी प्रामाणिक राहून तळागाळातील लोकांसाठी काम करणाऱ्या आप्पांसारखी माणसं आजही राजकारणात आहेत. आप्पांच्या लाल बावट्यात, त्यांच्यासोबत सावलीसारखे राहून नडलेल्यांची कामं करणाऱ्या लढाऊ वृत्तीचा आणि सच्चा कार्यकर्ता दत्तराव अचानक काँग्रेस पक्षात जातो. रक्तात भिनलेल्या डाव्या विचारांना एका क्षणात तिलांजली देऊन रात्रीत माणूस परस्परविरोधी विचारांच्या पक्षात जातोच कसा, या नेहमी सतावणाऱ्या प्रश्नाचा शोध ही कथा घेते. आयुष्यभर जपलेल्या विचारांमुळे निर्माण झालेली घुसमट मुखर करते. दत्तराव मुलीच्या लग्नाच्या आर्थिक ताणात अपरिहार्यतेतून पक्षांतराचा निर्णय घेतो. नानानेही आपल्याला होणारा विरोध कायमचाच संपवावा, या हेतूने दत्तरावला शिताफीने पक्षात ओढले आहे. दगडाखाली हात सापडलेल्या माणसाला कसे वापरून घ्यायचे आणि 'उकळलेली पत्ती'सारखे मनाचा दाह करणारे बोल अप्रत्यक्ष ऐकवायचे, हे आज राजकारणात माणसाचे काय होतेय याचे बोलके उदाहरण आहे. सुबत्ता, स्थैर्य देणाऱ्या पक्षात येऊनही दत्तरावचे मन जुन्या गोतावळ्याकडे ओढ घेते. सामान्यांसाठी लढण्याची ऊर्मी देणाऱ्या लढाऊ लाल बावट्यात आयुष्य घालवलेल्या दत्तरावची तगमग राजकारणाचे जळजळीत वास्तव आहे. त्याचे जुने सहकारी काँग्रेस प्रवेशाने अचंबित आणि नाराज झाले आहेत. ते माघारी त्यांची 'टिचरी गोटी' अशी संभावना करतात. घडल्या प्रकाराबद्दल दत्तरावही स्वतःच्या मनाची समजूत घालत असले, तरी त्यांचे जुने सहकारी टोचून बोलतात तेव्हा त्यांना 'भरबाजारात नागवं केल्यासारखं वाटतं'. ही कथा केवळ दत्तरावच्या पक्षांतराची कथा नाही, तर आजच्या राजकारणाची स्वाभिमानच विरून जाण्याची कथा आहे.

हे वास्तवच लोमटयांच्या चिंतनाचा विषय आहे. त्यांच्या जवळजवळ सर्वच कथांना हा राजकीय संदर्भ आहे. किंबहुना त्यांची कथा या राजकीय पृष्ठभूमीवर उभी आहे. 'कुभांड' ही कथाही याच राजकारणाचा एक विद्रूप चेहरा आहे. कुभांड रचणे ही राजकारणाची एक व्याख्या बनलेला हा काळ आहे. गवळणबाईच्या मुलाने मोसंबी चोरल्याच्या क्षुल्लक भांडणाची परिणती गरिबांचा संसार उद्ध्वस्त करते. कुभांड रचण्याला आणि रचणाऱ्यांनाच सध्या महत्त्व असून, कुभांडाला राजकीय डावपेच असे गोंडस नावही मिळाले आहे. तथापि, राजकारणात रचलेले कुभांड अनेकांच्या जीवनाचा मात्र खेळ करते. 'कुभांड' ही अशा खेळाची कथा आहे. या खेळात पिचला आणि भरडला जाणारा सामान्य माणूस हाच लोमटयांच्या कथेचा केंद्रबिंदू आहे. 'कुभांड' कथा गावातील राजकारण कसे पराकोटीला पोहोचले आहे याचा प्रत्यय देते. येथे 'बोट लावलं तर पोट आलं' म्हणण्याइतके राजकारण निचतम पातळीला गेले आहे. मालीपाटील आणि सरपंच



अनुक्रमणिका

यांच्यामधील टोकाचा सत्तासंघर्ष इतके खालचे टोक गाठतो, की मालीपाटलांवर गवळणबाईच्या माध्यमातून ॲट्रासिटीचा गुन्हा दाखल केला जातो. नंतर गवळणबाईचा काटा काढण्यासाठी मालीपाटील गावातील टपोरी पोरं हाताशी धरून तिच्या छळ मांडतात, तिच्या संसाराचा 'कुटाणा' आरंभतात. मालीपाटील सरपंचाच्या डावाने एवढे घायाळ झालेत, की 'लोकांनी निऱ्हाच पालापाचोळा समजलं आपल्याला, आता तिनं भाकरीला खावा अन् भाकरीनं तिला', अशी सूडाची भाषा ते बोलतात. मालीपाटील-सरपंचाचे राजकारण होते, पण यांच्या राजकारणात गरिबाच्या संसाराची मात्र होळी होते. 'कुभांड' कथेतील डावपेचाच्या राजकारणाचेच एक वास्तव 'जीत' या कथेमध्येही येते. नडलेल्याला खिंडीत पकडून वश करून घेणे हा राजकीय व्यवहार झाला आहे. आज राजकारणात कोणी कोणाचे कायमचे मित्र आणि शत्रू नसते. माणसापेक्षा येथे सत्ता हीच अंतिम असल्याने सत्ताकांक्षेने आजचे राजकारण रोज रंग बदलते. अशा रंगबदली राजकारणाची ही कथा आहे.

या राजकारणाचा अजून एक चेहरा 'वळण' या कथेमध्येही दिसतो. राजकारणातून झालेल्या खुनाची अनाहूत साक्षीदार झालेल्या प्रयागच्या परवडीची ही कथा आहे. तिची शिक्षणाविषयीच्या असोशीची थक्क करणारी ही गोष्ट आहे. तिची ही असोशी या कथेला एक परिमाण देते. सभोवतालच्या पराकोटीच्या अभावग्रस्त जीवनातून बाहेर पडण्याला शिक्षण हाच एकमेव मार्ग तिला दिसतो. म्हणून शिक्षण बंद झाले तर आपले काय हाल होतील याची पुरती जाण तिला आहे. या मुलीला कमी वयात आलेली ही जाण अचंबित करणारी आहे. मुलींना शिकवणे फारसे महत्त्वाचे न मानणाऱ्या समाजात आलेली जागृती सध्या सर्वत्र दिसते. या जागृतीचे वृत्तांकनच आसाराम लोमटे यांनी 'धूळपेर'मधील 'पोरी पळत आहेत रानातून' या लेखामध्येही केलेले आहे. 'वळण' कथेतील प्रयागच्या शिक्षणासाठी झटणारे तिचे अशिक्षित आई-वडील आणि तिच्या शिक्षणाविषयी प्रश्नचिन्ह निर्माण करणारा समाज यांच्यामधील अदृश्य संघर्ष या कथेत येतो. प्रयाग वाडीवरून गावात पायी शाळेला जाताना वाटेवर झालेल्या खुनाची ती साक्षीदार होते. दोन गटांतील संघर्षातून झालेल्या या खुनाबद्दल कोणीही तोंड उघडणार नाही, एवढी दहशत या गटांची असते; परंतु शिक्षकांच्या समजुतीनंतर प्रयाग जबाबाला तयार होते. ती जबाब देते आणि तिच्या जीवनात वादळ उठते. तिच्यावर, तिच्या शिक्षकांवर, वडिलांवर तिचे शिक्षण थांबवण्यासाठी दबाव येतो. या दबावाच्या वातावरणातही ती आपले शिक्षण बंद झाले तर काय होणार, या विचाराने हैराण होते. नव्या बदलाचे सूचन देणारी प्रयागची शिक्षणासाठीची तगमग थक्क करणारी आहे.

■

आसाराम लोमटे यांच्या कथेप्रमाणेच उपरोल्लेखित 'धुळपेर' या लेखसंग्रहातही उन्हाचा दाह सोसत निपूटपणे उभी असलेली माणसे भेटतात. 'धुळपेर'मध्ये पन्नास लेख आहेत. या सर्व लेखांत आजच्या ग्रामीण भारताच्या वास्तवांकनाचे सामर्थ्य आहे. दरिद्री, अन्यायग्रस्त माणसांबरोबर ज्यांची अविरत ससेहोलपट सुरू आहे, ज्यांचे जगण्याचे प्रश्न कधीच संपणार नाहीत, अशा माणसाचे जगणे लोमटे या लेखांमध्ये मांडतात. जीवनाचा दुष्काळ कधी तरी संपेल या आशेवर जगणारी माणसे आणि त्यांच्या दुःखभोगाच्या कहाण्या या लेखांमध्ये शब्दबद्ध झाल्या आहेत. माणसांमध्ये फूट पाडणाऱ्या, समाजामध्ये दरी निर्माण करणाऱ्या प्रवृत्ती, अत्याचारी आणि शोषकांच्या मानसिकतेचाही शोध हे लेख घेतात. या लेखनामागे सखोल समाजभान आणि निश्चित भूमिका आहे. हे लेख ज्या माणसांविषयी आहेत त्यांच्या दुःख-भोगाला स्पर्श करणारी भाषा हे या लेखसंग्रहाचे एक वैशिष्ट्य आहे. आज अस्वस्थ करणाऱ्या आजूबाजूच्या घटना आणि सतत डोके वर काढणाऱ्या नानाविध प्रश्नांचा वाढता दाह 'धूळपेर' वाचताना जाणवत राहतो.

या साऱ्या लेखनासाठी लोमट्यांनी वापरलेली भाषा

---

**निवेदन**

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'मधील मुख्य शाखा आणि जिल्हा शाखांचे कार्यवृत्त संबंधितांनी मार्च, जून, सप्टेंबर आणि डिसेंबर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यालयात पाठवावेत अथवा इ-मेल करावेत. कार्यवृत्त टाईप करून अथवा सुवाच्य अक्षरात लिहून पाठवावेत. कृपया वर्तमानपत्रांची कात्रणे पाठवू नयेत. तसेच कार्यवृत्ताचा मजकूर थोडक्यात असेल याची काळजी घ्यावी.

**– प्रकाशक**

त्यांच्या लेखनाचे बलस्थान ठरली आहे. लोमटे आपल्या भाषेतूनच प्रदेशवास्तवाविषयीचे भान देतात. मराठवाड्याच्या दुष्काळी, अवर्षणग्रस्त प्रदेशातील माणसाचे जगणे त्यांची भाषा साक्षात उभे करते. शेणासोबत येणाऱ्या मातीप्रमाणे त्यांची भाषा समाजाचा व्यापक संदर्भ पुरवते. घटना, प्रसंगांबरोबर मानवी स्वभाव आणि भाव-भावनांचे रेखाटन करणारी खास मराठवाडी शैली त्यांना अवगत आहे. व्यवहारातीलच शब्द ते कौशल्याने वापरतात. वर्तन आणि प्रसंग-परिस्थिती वर्णनासाठी वापरलेल्या प्रतिमा ते बोलीभाषेतून आणतात. त्यांच्या अशा भाषावापराने आशय मनावर ठसवला जातो. बोलीभाषेतील त्यांनी वापरलेल्या अर्थघन शब्दांनी बोलीतील शब्दांची अर्थवत्ता अधोरेखित होतेच, शिवाय मराठीच्या सौंदर्यातही भर पडते. डोक्याला उकीर लागणे, कानकोंड्यासारखे वाटणे, आयागमनी होणे, अडचा-कांड्यावर दिवस येणे, पाणी तोडणे, रंजीस येणे, जमिनी खरडून घेणे, नाट लावणे, आरबाळणे, झपका, पायपोळ, निकरट, कलागत, कुटाणा इत्यादी शब्दप्रयोग आणि निजामशाही राजवटीत मराठवाड्याच्या मातीत रुजलेले बरसणे, घडी, नजर, तुफान, जिंदगी, परेशानी सारखे शेकडो उर्दू शब्द लोमट्यांच्या भाषेचा भाग आहेत. त्यांच्या अशा भाषावापराने आपण मराठवाड्यातील दुष्काळ, तेथील शेतकऱ्यांची त्या प्रदेशाशी आणि काळाशी चाललेली झटाझोंबी प्रत्यक्षच अनुभवत असल्याचा प्रत्यय येतो.

मराठवाड्याच्या पाचवीला पूजलेल्या दुष्काळाने तेथील जीवनालाच चोहोबाजूने वेढलेल्या रखरखीची कथा आसाराम लोमटे यांनी लिहिली आहे. या जीवनाचे समृद्ध आकलन हे त्यांच्या कथेचे बलस्थान आहे. लोमट्यांच्या कथेची पृष्ठभूमीच हा अवर्षणग्रस्त प्रदेश आहे. तेथील भूगोलाचा माणसाच्या जीवनावर झालेल्या खोलवरच्या परिणामाचे चित्रण ही कथा करते. समोरील वास्तवाचा अर्थ लावण्याची आणि सरळपणे भिडण्याची लोमट्यांची म्हणून एक खास शैली आहे. आज कोणालाही ज्यांची चिंता वाटेनाशी झाली आहे अशा अभावग्रस्त, शोषित माणसाच्या बाजूने लेखक उभा आहे.

एकंदरीत, लोमटे त्यांची कथा गावगाड्याच्या पडझडीची कहाणी आहे. ती त्यांनी अनेक पद्धतीने सांगितली आहे. 'आलोक'मधील सुखात्म शेवट असलेल्या काही कथा वगळता त्यांच्या कथांचे शेवट खुले



आणि अस्वस्थ करणारे आहेत. त्यांच्या कथांमधील प्रवृत्ती वाचकाचे स्वास्थ्य हिरावून घेतात. गरीब, शोषित माणसाची गोष्ट सांगता सांगता लोमटे खेड्याच्या उजाडीकरणाचे भयाण वास्तव उजागर करतात. ही कथा वर्तमानाने वैराण केलेल्या माणसाची खोलवरची सल व्यक्त करते. हा काळच सामान्य माणसावर उलटला असून काळानेच त्याची भरड सुरू केली आहे. या भरडीत माणसांची गोटी होण्याची गोष्ट लोमटे सांगतात. ही कथेतील गावं उजाड करणाऱ्या प्रवृत्ती बाहेरून गावात शिरलेल्या नसून त्या गावातच जन्मल्या आहेत. लोमटे या प्रवृत्तींचा शोध घेतात. त्यामुळे व्यापक जीवनाशय असलेली दीर्घकथा लोमटे लिहितात. त्यांच्या कथेतील व्यापक जीवनाशय पाहता, ती कादंबरीच्या अवाहकतेचा अनुभव देते. कादंबरीप्रमाणेच जीवनव्यवहाराचा विस्तृत पट आणि सूक्ष्म गुंतागुंत ती सामर्थ्याने टिपते.

व्यापक अर्थाने लोमटे यांची कथा आजच्या ग्रामीण भारताची कथा आहे. ती गरीब, अभावग्रस्त माणसाचे शोषण करणाऱ्या व्यवस्थेचा शोध घेण्यात गुंतली आहे. काळाचा रेटा, धनदांडग्यांचा दाब आणि राजकारणातील नव्या प्रवृत्तींमुळे ज्यांच्या जीवनाविषयी नाना प्रश्न उभे राहिले आहेत अशा दुबळ्या आणि शोषित माणसाच्या जगण्याचा तळठाव ती घेते, त्यांचा दाबलेला आवाज होते. या कथांमधील अनेकांचे जीवन माथे फोडणाऱ्या रखरखीत उन्हात सावली शोधण्याच्या धडपडीतच संपून जाते. लोमट्यांची कथा शेतकरी, स्त्रिया, मजूर, कामगार यांच्या निरागस आणि अभावग्रस्त जगण्याचे वर्तमान टिपते. जगणे अर्थपूर्ण करू शकेल अशी कोणतीही घटना जीवनात नजीकच्या काळात दिसत नसतानाही, त्यांची जीवनावरील श्रद्धा जशी दिसते तशीच जीवन संपवून टाकणारी हतबलताही या कथेत दिसते. आसाराम लोमटे यांच्या कथेच्या परिघात वर्तमान ग्रामवास्तवातील नानाविध प्रश्न, शोषित, पीडित असा मोठा वर्ग येतो. एकूणच, गावच्या उद्ध्वस्तीकरणाचा तळस्पर्शी शोध त्यांची कथा घेत असल्याने, ती खेड्याच्या उजाडीकरणाची कर्मकहाणी बनते.

◆

**डॉ. नंदकुमार मोरे**
मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
इ-मेल : nandkumarmore@ymail.com&



अनुक्रमणिका





निमित्ताने

प्रा. किरण गाढवे

# मनस्विनी लता रवीन्द्र

## समकालिनांमध्ये वेगळे स्थान प्राप्त केलेली कथालेखिका



या कथांमध्ये येणारी पुरूषपात्रे आणि स्त्रीपात्रे ही सहजपणे समाजातील सर्वच बाबींचा मुक्तपणे स्वीकार करणारी दिसतात तसेच काही परंपरादी जळमटांचे ओझे खांद्यावर वागवणारीही दिसतात.काही काळानुरुप बदलणारीही दिसतात. विशेषतः स्त्रीपात्रे या कथासंग्रहामधून वेगळ्याच पद्धतीने अर्थात नव्याने स्वीकारलेल्या बदलांसह अधोरेखित केलेली आहेत.जागतिकीकरणानंतर तयार झालेल्या नव्या युगाची अभिव्यती बेधडकपणे या कथेतून येताना दिसते.

'ब्लॉगच्या आरशापल्याड' हा मनस्विनी लता रवीन्द्र यांचा 'नोव्हेंबर २०१४' मध्ये प्रसिद्ध झालेला कथासंग्रह आहे. बारा कथांचा समावेश असलेला हा कथासंग्रह आणि या कथासंग्रहातील प्रत्येक कथा ही आजवरच्या मराठी कथेच्या परंपरेतील एक वेगळच अनुभवविश्व समोर आणणारी दिसते. सद्यस्थिती समोर आणणाऱ्या या कथा काळाच्या सीमारेषा अधोरेखित करणाऱ्या आहेत. त्याचबरोबर नव्याने रूढ झालेले सामाजिक संकेत, सांस्कृतिक व्यवस्था यासर्वांना कवेतं घेणाऱ्या आहेत.या कथांमध्ये येणारी पुरुषपात्रे आणि स्त्रीपात्रे ही सहजपणे समाजातील सर्वच बाबींचा मुक्तपणे स्वीकार करणारी दिसतात, तसेच काही परंपरादी जळमटांचे ओझे खांद्यावर वागवणारीही दिसतात.काही काळानुरूप बदलणारीही दिसतात. विशेषतः स्त्रीपात्रे या कथासंग्रहामधून वेगळ्याच पद्धतीने अर्थात नव्याने स्वीकारलेल्या बदलांसह अधोरेखित केलेली आहेत.जागतिकीकरणानंतर तयार झालेल्या नव्या युगाची अभिव्यती बेधडकपणे या कथेतून येताना दिसते.

'मळक्या पायाची मुलगी' ह्या कथेतील निवेदक रेल्वेमधून प्रवास करत असताना त्याला एक सुंदर परंतु मळक्या पायाची मुलगी दिसते. त्यावरून स्रियांशी निगडीत असलेले अनेक संदर्भ या कथेत येतात. उदा. मी पूर्ण वेळ त्या मुलीला बघत होतो... एकंदर माझा स्त्रिया, मुली यांच्याबद्दलचा अभ्यास अचाट आहे... अशा अमुक पद्धतीच्या दिसणाऱ्या मुली, बेडमध्ये कशा असतील ह्याचे आडाखे बांधणं माझं ताबडतोब सुरू होतं... आणि ते बहुतेक वेळा खरे पण निघतात. ही मळक्या पायाची पण भारी असणार. फक्त पाय मळके आहेत च्यायला हिचे.. ( पृ.११) अशाप्रकारे या कथेतील निवेदक त्याच्या मनातील स्त्रीविषयक लैंगिक विचार व्यक्त करताना दिसतो. स्त्रियांकडे पाहण्याचा समाजातील पुरूषांचा दृष्टिकोन यामधून समोर येतो. चोराने चपला चोरल्यामुळे त्या मुलीचे पाय मळलेले असतात. अशाप्रकारे छोट्या प्रसंगाच्या अनुषंगाने लेखिका पुरुषांच्या मनातील विचार मांडताना दिसते.

'हातात सुकाणू घेऊन भूर्रर..' ही कथा निवेदिकेची मैत्रीण 'अरू' आणि निवेदिका यांच्याशी निगडित आहे. जागतिकीकरणानंतरची ही नवी पिढी समाजातील सर्वच बदलांचा सहज स्वीकार करते. निवेदिकेच्या काकांनी केलेला आंतरजातीय विवाह, अरूच्या आईला दुसऱ्याच पुरुषवीर्यातून

झालेला मुलगा असे काही संदर्भ येतात. या स्वीकारामागेही दुःखाची भावना नक्कीच आहे. सुकाणू एकाच्या हातात असतो आणि त्यांचा रिमोट दुसऱ्याच्याच हातात असतो.विशेषतः स्त्रियांकडे राजकारणातील कोणतेही पद असेल तर कारभार त्या स्त्रीचा नवराच पाहतो. ग्लोबलायझेशनच्या या युगात स्त्रियांना प्रत्येक क्षेत्रात संधी उपलब्ध आहेत; परंतु त्यांचा रिमोट दुसऱ्याच्या हातात अजूनही आहेच हे या कथेतून समोर येते.निवडणुकीला उभा राहिलेल्या अरूबद्दल निवेदिका असा विचार करते की, आणि मला प्रश्न पडतो अरू कुठे आहे?अरूच्या हातातला सुकाणू? त्याचा रिमोट कंट्रोल कुणा दुसऱ्याच्या हातात होता तर... आणि तिला वाटत होतं आपणच बोट चालवतोय... असंच सगळ्यांना वाटतं.आपणच चालवतोय बोट आणि आपणच याचे सूत्रधार... पण नाही बोट कुणीतरी दुसराच चालवत असतो आणि तो दुसराही ठरलेला असतो... त्याचा रंग, त्याचा वर्ण, त्याचं लिंग सगळं ठरलेलं आहे... (पृ.३९ )तुम्ही बलवान नाही आणि आम्ही तुम्हाला होऊही देणार नाही अशाप्रकारचे पुरुषी राजकारण असते.याचे भान असणारी निवेदिका आपली वैचारिक पातळीवरील खदखद यामधून व्यक्त करते. जागतिकीकरणोत्तर काळातील स्त्रियांच्या जडणघडणीकडे आणि स्वातंत्र्याकडे तटस्थतेने पाहणारी निवेदिका या कथेत पहायला मिळते.

'आणि तो नायक ठरला' या कथेत घटस्फोट घेऊन दुसरे लग्न केलेल्या अनिल पांढरपांडे आणि त्याच्या दुसऱ्या लग्नाच्या बायकोचे कृत्रिमपणे एकमेकांना समजून घेणे, आणि पहिल्या बायकोच्या बाजूने उभी असणारी या कथेची निवेदिका अतिशय थट्टेने अनिल पांढरपांडेचे ढोंग समोर आणते. संपूर्ण कथा पहिल्या बायकोच्या बाजूने उभी असलेली दिसते. स्वतःच्या कोशात जगणाऱ्या भोंदू अनिल पांढरपांडेच्या आयुष्यातील विविध प्रसंग अधोरेखित करून लेखिकेने मेलेल्या संवेदनेच्या माणसाच्या जीवनाचे प्रातिनिधीक रूप यामधून समोर आणलेले दिसते.

एखाद्या कथेला नाट्यात्मक कलाटणी देणे हे मनस्वीनी लता रवीन्द्र यांच्या कथांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे असे म्हणावे लागेल. 'मधुबाला आणि लोडशेडिंग' या कथेत मधुबाला या चित्रपटसृष्टीत नावाजलेल्या हिरॉईनचा चाहता असलेला नायक आहे.अगदी मधुमालामय जीवन तो जगतो आहे. परंतु लोडशेडिंगमुळे आपलीच बायको त्याला शेवटी मधुबाला असल्याचा भास होतो. मी उठून पलंगावर जाऊन पडलो. ती माझ्या जवळ आली. माझ्या हातावर तिचं डोकं ठेवत म्हणाली. ऐक ना, तू ती मधुबालाची गाणी हेडफोन लावून नको ना ऐकत जाऊस. मोठ्याने ऐकत जा... मला पण खूप आवडतात ती ऐकायला. किती सुंदर होती ना ती. आणि तशीच मनात राहिलीये कायम. अशी खळखळत हसणारी... माझ्या डोळ्यांनी अंधारातही तिच्या डोळ्यांचा शोध घेतला. मी तिच्याकडे एकटक बघितलं आणि मला जाणवलं किती सुंदर आहेत हिचे डोळे. मधुबालासारखेच अगदी. मिश्किल आणि बोलके... मी तिला खूप खूप जवळ घेतलं. खूप म्हणजे खूप घट्ट. (पृ.५८) अशाप्रकारे नाट्यात्मक वळण ही कथा घेते. मनस्विनी लता रवीन्द्र यांच्या कथेतील पुरुष हा लैंगिक संबंधांकडे वेगळ्याच दृष्टिकोनातून पाहणारा दिसतो.समाजातील प्रचलित पुरुषी मानसिकता अतिशय बारकाईने टिपण्याचे काम ही कथा करते. जागतिकीकरणोत्तर युगात स्त्रियांच्या समाजातील, कुटुंबातील स्थानाची मीमांसा ही कथा करते. शोषण सुरूच आहे फक्त त्याचे स्वरूप आणि धागेदोरे बदलले आहेत. स्त्री-पुरुष संबंधाबरोबरच शहरीकरणामध्ये लुप्त झालेले नातेसंबंध आणि त्यामुळे नष्ट झालेला जातिभेद यावरही या कथा भाष्य करतात. 'काळ्याकुट्ट वेळी' या कथेमधून समोर येणारे अनुभवविश्व हे आजच्या काळाला लागू न होणारे आहे. जागतिकीकरणोत्तर युगात गर्भपात करणारे तंत्रज्ञान उपलब्ध आहे; परंतु या कथेत अगदी जुन्या पद्धतीने पोट चोळून गर्भपात कशाप्रकारे केला जात होता याकडे लक्ष वेधलेले आहे. कदाचित लेखिकेला स्त्रियांना पूर्वीपासूनच या समस्यांना तोंड द्यावे लागत आहे हे सूचवायचे असावे असे वाटते. स्वतःची हवस पूर्ण करणारे नराधम सर्वच काळात आहेत. भगव्या राजकारणाचा वसा घेतलेला निवेदक या कथेत आहे. आपल्या मुलीशी शरीरसंबंध ठेवणारा बाप या कथेत आहे. निवेदकाची आई निवेदकाला (म्हणजे तिच्याच मुलाला) म्हणते, बायकांचं आयुष्य महाभयंकर रे बाबा. आपलं पोट चालतं म्हणून नाय करत मी.त्या पोरींनी चूक केली; केली तर केली. पण जीवबीव दिला तर अजून मोठं पाप ठरेल ते. कुंतीने कर्णानंतर जीव दिला असता तर महाभारत घडलं असतं होय? (पृ.७२) या वाक्यानंतर सावित्रीबाई फुलेंचा वारसा पुढे चालवणारी माय प्रत्येक काळात आहे असे वाटते. काळ्याकुट्ट वेळी ही कथा भगव्या राजकारणात चिरडलेल्या मानसिकतेच्या निवेदकाची आहे त्याचबरोबर या सर्व व्यवस्थेत स्त्री

कशाप्रकारे बळी जातेय यावर भाष्य करणारी आहे; परंतु स्त्री तेवढीच सामर्थ्यशालीही असलेली दिसते. 'ब्लॉगच्या आरशापल्याड' या कथासंग्रहातील कथांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे पुरुषांच्या वैचारिक विसंगतीवर या कथा हल्ला करतात. बाईकबिना हिरो कथेतील निवेदक, हातात सुकाणू घेऊन भुर्रर कथेतील अरूचे वडील, आणि तो नायक ठरलामधील अनिल ही त्याची उदाहरणे आहेत.

सोशल मिडियावरील तकलादू मैत्री,सामान्य माणसाचे समाजातील स्थान, स्वार्थी प्रवृत्ती, उच्चशिक्षण घेऊनही आचार विचारामध्ये असणारी वैचारिक नग्नता या सर्वाला बेधडकपणे ही कथा भिडते. बाईनबिना हिरो कथेतील दोंदे म्हणतो, या क़लयुगात देव तरी व्हाव किंवा इंडस्ट्रिअलिस्ट तरी. बाकीच्यांचं काही खरं नाही बॉस...(पृ.८४) तसेच याच कथेतील निवेदक सोशय मिडियावरील मैत्रीबद्दल बोलताना म्हणतो, इथे कोण माणूस नाही. फक्त जनावरं आहेत. ओरबाडून घेणारी. आणि इथे येऊन हवं तेवढं व्हच्युअली समोरच्याला ओरबाडून घ्या. स्वतःच्या चिथळ्या होऊ द्या. कारण सगळ्यांचे चेहरे झाकलेले आहेत. कोण कोणाशी संभोग करतोय कळतही नाहीये. आणि संभोगही कसला तर कल्पनेतला.मनातला. मनाची ओकारी करायचं बेसिन आहे हे असंच म्हणायला हवं. अ ग्लोबल सायबर बेसिन.(पृ.८९) याबरोबर बाईकबिना हिरो ही कथा स्त्री आणि पुरुष यांच्यातील वैचारिक दरी मांडते. कृतिशील आचार विचार अंगिकारलेली स्त्री या कथेतून पुढे येते.

ब्लॉगच्या आरशापल्याड या शीर्षक कथेमध्ये आदालिया ऑस्टीन या आंतरराष्ट्रीय मुलीचा ब्लॉग वाचून प्रभावित झालेली निवेदिका आहे.ब्लॉग वाचून ती त्या संदर्भांच्या अनुषंगाने समाजातील विविध बाबींचा तसेच कौटुंबिक बाबींचा विचार करते. तसेच स्वतःच्या जीवनातील, कुटुंबातील ताणतणावांच्या गोष्टी सांगते.

मनस्विनी लता रवीन्द्र यांच्या कथेत व्यक्तिप्रधानतेला महत्त्वाचे स्थान असलेले दिसते. त्यांच्याकथेतील पात्रे कौटुंबिक, शारीरिक, सामाजिक, राजकीय, मानसिक अंगांनी वावरताना दिसतात. कथेतील प्रत्येक पात्राचे अंगभूत असे वेगळे वैशिष्ट्य आहे. मानवी जीवनातील प्रत्येक घटकाला स्पर्श करणारी ही पात्रे आहेत. मोजक्या घटनांना मोजक्याच अवकाशात मोजक्या पात्रांच्या साहाय्याने मांडून योग्य अशा आशयाची मांडणी करणे हे कोणत्याही चांगल्या कथाकाराचे वैशिष्ट्य असते. ही कला मनस्विनी लता रवीन्द्र या लेखिकेने कलात्मकतेने साधलेली दिसते. त्याचबरोबर कथेतील वातावरण हे कथाभागाशी निगडीत असलेल्या आशयाशी मिळतेजुळते आणि दृश्यात्मक स्वरूपाचे आहे. बहुधा कथेतील निवेदक पात्रांना नावे नाहीत. सुसाइडवाला लव्ह,आणि तो नायक ठरला या कथांबरोबरच इतर कथांमध्येही निवेदनामध्ये प्रयोगशीलता असलेली दिसते. कथेमधील भाषा ही त्या त्या कथेच्या आशयाच्या अनुषंगाने वापरलेली दिसते. भाषेमध्ये लवचिकता आहे आणि त्यामुळे निवेदनाला वेगळी लय प्राप्त झाल्याचे या कथांमध्ये दिसते. कथेमध्ये भडक बोल्ड चित्रणांचा समावेश नाही. स्त्रियांच्या जीवनाच्या अनुषंगाने रडवेली वर्णने नाही. यासर्व बाबी मनस्विनी लता रवीन्द्र या कथालेखिकेला समकालीन लेखिकांमध्ये वेगळे स्थान प्राप्त करून देतात.

यामुळेच विभावरी शिरूरकरांपासून गौरी देशपांडे, कमल देसाई, सानिया यापरंपरेत मनस्विनी लता रवीन्द्र यांना स्थान प्राप्त होताना दिसते.

◆

**प्रा.किरण गाढवे**



श्रद्धांजली

प्रा. डॉ. अरुण कोळेकर

# अभावग्रस्ताला चेहरा देणारा कथाकार वामन होवाळ

**वामन गोविंद होवाळ हे मराठी कथाविश्वातील एक महत्त्वपूर्ण असे नाव. नुकतेच त्यांचे (दि.२३ डिसेंबर २०१६) निधन झाले. त्यानिमित्ताने त्यांच्या कथालेखनावर टाकलेला प्रकाशझोत.**

दि.१ एप्रिल १९३८ रोजी सांगली जिल्ह्यातील तडसर या गावी वामन होवाळ यांचा जन्म झाला. आपले प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण त्यांनी त्यांच्या जन्मगावीच घेतले. १९५६ साली ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. वडील मुंबईला गोदीत कामाला असल्यामुळे पुढील शिक्षणासाठी ते मुंबईला आले. १९७४ साली सिद्धार्थ कॉलेज आणि ठाणे महाविद्यालयातून बी.ए.ची पदवी घेतली. पुढे त्यांनी रेल्वेत नोकरीही मिळविली. कार्यालयीन अधीक्षक पदावरून ते सेवानिवृत्त झाले होते. जवळजवळ ७८ वर्षाचं आयुष्य त्यांना लाभलं

वामन होवाळांना शालेय जीवनातच कथेची आवड निर्माण झाली होती. त्या आवडीपोटी ते कथालेखनाकडे वळले. 'किर्लोस्कर' मासिकातून त्यांना शंकर पाटलांची कथा प्रथम वाचायला मिळाली. त्या कथा वाचनाने आपणही कथा लिहावी, असे त्यांना वाटू लागल्याची कबूली त्यांनी दिली आहे. असे वाटण्याच्या जोडीलाच शाळेतील शिक्षकांच्या प्रोत्साहनाने, कौतुकाने त्यांनी कथा लिहिण्यास प्रारंभ केला. 'माणूस' ही त्यांची पहिली कथा प्रसिद्ध झाली. ती 'कथालक्ष्मी'च्या मार्च, १९६३ मधील अंकात. त्यानंतर त्या काळी कथालेखनाला वाव देणाऱ्या 'सत्यकथा', 'धनुर्धारी', 'रांजश्री', 'यशवंत', 'वसुधा' यांसारख्या मासिकांतून त्यांच्या अनेक कथांना प्रसिद्धी मिळत गेली. त्यातूनच वामन होवाळांसारखा समर्थ कथाकार मराठी कथाविश्वाला, साहित्याला परिचित होत गेला. वामन होवाळांच्या कथांचे पुढे 'बेनवाड' (१९७३), 'येळकोट' (१९८५), 'वारसदार' (१९८६), 'वाटा आडवाटा' (१९८७) यांसारखे कथासंग्रह मराठी कथाविश्वात दाखल झाले. त्यांच्या गाजलेल्या 'मजल्याच घर' आणि 'पाऊसपाणी' या कथा भाषेच्या, देशाच्या भिंती ओलांडून इंग्रजी आणि फ्रेंच भाषेत अनुवादित झाल्या आहेत. एवढा सन्मान त्यांच्या कथांना मिळाला.

वामन होवाळ (विशेषत: ग्रामीण आणि दलित कथाकार) म्हणून जितके सर्वपरिचित झाले. तितकीच त्यांची लोकनाट्येही लोकप्रिय झाली आहेत. त्यांनी 'नाम्या म्हणे मी उपाशी', 'जपून पेरा बेणं', 'आंधळ्याची वरात बहिऱ्याच्या घरात' यांसारखी प्रबोधनात्मक, परिवर्तनवादी विचारधारेच्या लोकनाट्यांची निर्मिती केली. 'नाम्या म्हणे मी उपाशी' हे त्यांचे लोकनाट्य शाहीर अमरशेख यांच्या कलापथकाने सादर करून लोकां-लोकांपर्यंत पोहोचविले. एका अर्थाने कथालेखकाबरोबरच












अनुक्रमणिका

त्यांची सच्चा लोकनाट्य लेखक ही ओळखही मराठी जनता विसरणार नाही.

दलित कथाकारांची एक समर्थ पिढी बाबुराव बागूलांपासून सुरू होते. अर्जुन डांगळे, योगिराज वाघमारे, केशव मेश्राम, भास्कर चंदनशीव हे या पिढीचे बिनीचे शिलेदार म्हणता येतील. त्यामध्ये वामन होवाळ हे नावही तेवढेच महत्त्वपूर्ण असे आहे. त्यांच्या 'येळकोट' या कथासंग्रहाला राज्य पुरस्काराने गौरविले गेले आहे. वामन होवाळांनी आपली स्वत:ची अशी एक वेगळी वाट चोखाळून कथालेखनाला आरंभ केला. त्यांच्या एकूणच कथांमधून गावाकडील, खेड्यातील सवर्ण आणि दलित यांच्यामधील संघर्ष अधोरेखित झाला आहे. गावगाड्यातील, दलितांमधील असणाऱ्या अज्ञानाला, अंधश्रद्धांना त्यांनी आपल्या कथालेखनातून नेमकेपणाने वाचा फोडली. सभोवतालच्या तत्कालीन परिस्थितीमधून त्यांना कथालेखनाची बीजे, विषय सापडत गेले. त्या कथाबीजाला, कथाविषयाला आपल्या खास अशा शैलीतून अभिव्यक्त करीत राहिले. खेड्यात घडणाऱ्या साध्यासुध्या घटना आणि प्रसंगातून त्यांना कथा सापडू लागली. त्यांची कथा खेड्यात घडते, खेड्यातल्या माणसाचे जगणे मांडते. ग्रामीण मनाचे भावविश्व उलगडून दाखविते. त्यांची कथा ग्रामीण-दलित यांच्यातील सीमारेषा एक करणारी, मिसळून जाणारी, पुसट करणारी अशी आहे. खेड्यात राहणारा दलित एकाच वेळी तो दलित असतो आणि तिथल्या प्रथा, परंपरा, अंधश्रद्धा, अनिष्ट चालीरीती, अस्पृश्यता, धर्म, जात यांचा तो शोषित, बळी ठरतो, भरडला जातो. शोषणग्रस्त, अभावग्रस्त होऊन जातो. अशा चेहरा नसलेल्या माणसाला वामन होवाळांनी आपल्या कथालेखनाचा विषय बनवून नवी ओळख, नवा चेहरा दिला. त्यांची कथा जागृत होऊ पाहणाऱ्या, परिवर्तनवादी विचारी मनाची ती कथा आहे. त्यांच्या कथालेखनातून हा दलित, सामान्य माणूस केवळ माणुसकीच्या न्यायहक्कासाठी, समता प्रस्थापित करणारा आहे. त्यामुळे ती विद्रोही बनते.

एका अर्थाने डॉ. प्रकाश खरात म्हणतात त्याप्रमाणे, 'वामन होवाळांची कथा जशी भावकथा, घटनाप्रधान कथा, चारित्र्यप्रधान कथा आहे. ती जशी मनोविश्लेषणात्मक कथा आहे त्याचप्रमाणे आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक विषयांचीही ती कथा आहे.' (दलित कथा : उगम आणि विकास, पृ.११). इतके पदर, आयाम वामन होवाळांच्या कथेला लाभताना दिसतात.

वामन होवाळांनी खेडूत माणसाच्या जगण्यातील दु:ख, दैन्य, दारिद्र्य अनुभवले, पाहिले होते. त्याचे म्हणून काही एक आकलन त्यांना झाले होते. त्यांच्या या कथालेखनामागे त्यांची स्वत:ची अशी परिवर्तनवादी, बदलाची गाढ अशी निष्ठा होती. हा समाज बदलायला हवा, अज्ञानाच्या आणि अंधश्रद्धांच्या जोखडातून तो मुक्त व्हायला हवा; कारण हेच त्यांचे खरे शोषक आणि शत्रू आहेत, असे समजून त्यांनी आपले कथाविश्व साकार केले. 'मजल्याचं घर', 'आतली टांग', 'वसुली', 'देव घावला, देव पावला', 'हिसका', 'बेनवाड', 'कुरघोडी', 'साखरेचं खाणार' या त्यांच्या कथा विशेष उल्लेख कराव्यात अशा उतरल्या आहेत. 'मजल्याचं घर', 'हिसका'सारख्या कथांतून त्यांनी दलित जीवनातील वास्तव अधोरेखित केले आहे. या कथातील माणसावर इथल्या परंपरावादी मनोवृत्तीचे, जीवनपद्धतीने त्यांच्यावर घोर अन्याय केला आहे. त्यांच्या शोषणाला इथल्या दैववादी, रुढी, धर्म, देव, परंपरा, जातवास्तव कारणीभूत आहे. हे सगळे तो नाकारू पाहतो आहे आणि ही शोषणव्यवस्था झुगारून देतो आहे. त्याच्यासाठी संघर्ष करण्याची तो तयारी करतो आहे. त्याचे प्रलयकारी चित्रण 'मजल्याचं घर' या कथेतून येते. सुधारणावादी विचार आणि परंपरावादी विचार यांमधला संघर्ष ही कथा नेमकेपणाने उभी करते. चांगल्या जगण्यासाठी संघर्षाची करण्याची तयारी बयाजीच्या मुलाच्या ठिकाणी आहे. ही बदलाची जाणीव नेमकेपणाने होवाळांनी शब्दांकित केली आहे. वामन होवाळांच्या काही कथा ग्रामीण, खेडूत माणसांचे अस्सल नमुने, त्यांचे स्वभावदर्शन घडवितात. वाचकाचे रंजन करता करता त्याला अंतर्मुखही करताना दिसतात. दु:ख, दैन्य, दारिद्र्य, शोषण यांचे चित्रण करता करता त्याला हास्यास्पद बनविण्याची एक वेगळी हातोटी त्यांच्याकडे होती. हेच त्यांचे इतर समकालीन कथाकारांपेक्षा वेगळेपण होते. त्यांची कथा रुढीग्रस्त, विषमतावादी विचारप्रणालीतील खोटेपणा, दंभ उघडा पाडणारी आहे. हे सगळे बेगडीपण सांगण्यासाठी त्यांनी धारदार शब्दांचा वापर करण्याऐवजी विनोदी अंगाचा वापर केल्यामुळेच त्यांची कथा सामाजिक असूनही विनोदी होताना दिसते. इतर दलित कथाकारांपेक्षा त्यांची ही शैली वेगळी ठरली; नव्हे ती अपवादात्मक अशी आहे.

कथेच्या आशयाला विनोदी, उपरोधिक अंगाने मांडण्याची त्यांची हातोटी दलित कथेत फार कमी प्रमाणात आढळताना दिसते. त्याचा एक तोटा वामन होवाळांच्या

**कथेच्या आशयाला विनोदी, उपरोधिक अंगाने मांडण्याची त्यांची हातोटी दलित कथेत फार कमी प्रमाणात आढळताना दिसते. त्याचा एक तोटा वामन होवाळांच्या कथेला झाला तो म्हणजे त्यांच्या कथेतील विद्रोह बोथट, संयमी होत गेला. मुंबईत राहून त्यांनी जसे गावगाड्यातील सामान्य, दलितवर्गाचे जगणे मुखर केले. त्याचबरोबर मुंबईतल्या झोपडीपट्टीतील, बकाल वस्तीतील जीवघेणा संघर्ष आणि जगणेही पाहिले. त्यालाही त्यांनी वाचा फोडली. कष्टकरी, सामान्य माणूस, दलित, अभावग्रस्त समाजमनाला, त्यांच्या दुःखाला वेशीवर टांगण्याचा, त्याला शब्द देण्याचा प्रयत्न सातत्याने केला. तो त्यांच्या लेखनाचा, चिंतनाचा प्रांत राहिला.**

कथेला झाला तो म्हणजे त्यांच्या कथेतील विद्रोह बोथट, संयमी होत गेला. मुंबईत राहून त्यांनी जसे गावगाड्यातील सामान्य, दलितवर्गाचे जगणे मुखर केले. त्याचबरोबर मुंबईतल्या झोपडीपट्टीतील, बकाल वस्तीतील जीवघेणा संघर्ष आणि जगणेही पाहिले. त्यालाही त्यांनी वाचा फोडली. कष्टकरी, सामान्य माणूस, दलित, अभावग्रस्त समाजमनाला, त्यांच्या दुःखाला वेशीवर टांगण्याचा, त्याला शब्द देण्याचा प्रयत्न सातत्याने केला. तो त्यांच्या लेखनाचा, चिंतनाचा प्रांत राहिला.

त्यांच्या कथेतील प्रतिमासृष्टी आणि भाषाशैली वाचकाला एका वेगळ्याच बोलीभाषेची, शब्दकळेची जाणीव करून देते. 'अंड्याला आलेल्या कोंबडीसारखी एस.टी.करकरली.' (बेनवाड, पृ.९) 'सात आठ वर्स झाली हे देवाचं सव्वा मणाचं ओझं माझ्या शिरावर हाय! ह्या देवाला तरी कणव येऊ नये का आपली?' ही भाषा वाचकाला थेट गावाकडे घेऊन जाते. तिथल्या माणसाची नाळ जोडते. अनुभवाशी एकरूप होऊन जाते. इतकी ती सच्ची, अकृत्रिम झाली आहे.

या सगळ्या कथाविश्वामागे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची विचारधारा असल्याकारणाने ती परिवर्तनवादी, माणसाच्या न्यायहक्कासाठी, शोषण व्यवस्था नाकारू पाहणारी अशी आहे. वामन होवाळांच्या जाण्याने ही कथा आता पोरकी झाली आहे. जागतिकीकरणाच्या आणि बदलत्या जीवनशैलीने सगळेच कसे सपाटीकरण चालू आहे. दलित चळवळीतही आता कसे शांत शांत होत चालले आहे. अशा स्थितीत त्यांचे जाणे मराठी कथाविश्वाला आणि दलित साहित्याला वेदनादायी आहे, पण याला इलाज नाही. वामन होवाळ तीन एक वर्षांपूर्वी 'आचार्य अत्रे मराठी साहित्य संमेलना'साठी सासवडला आले होते. त्या संमेलनात कथाकथनाच्या कार्यक्रमाचे ते अध्यक्ष होते. आपल्या कथाकथनात त्यांनी 'माझ्या कथालेखनाची कथा' उलगडून सांगून श्रोत्यांना खिळवून ठेवले होते. कथाकथन करण्याची त्यांची एक खास अशी शैली होती. ती त्यांनी स्वतः निर्माण केली होती. आपल्या या शैलीने त्यांनी महाराष्ट्रभर कथाकथनाचे कार्यक्रम केले. या निमित्ताने त्यांचा मला परिचय झाला. तेवढ्या कमी वेळात आणि झालेल्या संवादातून मला त्यांच्यातला 'माणूस' आपलासा करून गेला. त्यांचा निगर्वी स्वभाव, साधेपणा आणि बोलण्यातला मनमोकळेपणा कायम लक्षात राहिला.

अशा या कथालेखकाला आणि त्यांच्यातल्या माणूसपणाला माझी विनम्र, भावपूर्ण श्रद्धांजली!

संदर्भ ग्रंथ :

१. अनिरुद्ध अनंत कुलकर्णी (संपादक) प्रदक्षिणा, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती-१९९१.
२. अंजली सोमण, मराठी कथेची स्थितीगती, प्रतिमा प्रकाशन पुणे. प्रथमावृत्ती-१९९५.
३. प्रकाश खरात, दलित कथा: उगम आणि विकास, सुगावा प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती-१९९२.
४. प्रभा गणोरकर आणि इतर (संपादक), संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश, जी.आर.भटकळ फाउंडेशन, मुंबई. प्रथमावृत्ती-२००४.

◆

**प्रा. डॉ. अरुण कोळेकर**
शरदचंद्रजी पवार महाविद्यालय, जेजुरी
चलभाष : ९४२०७२५५०१



श्रद्धांजली

डॉ. स्नेहल तावरे

# विभा
## चैतन्यदायी नाट्यसमीक्षक

विभा नाटक शिकवायचे आणि त्यात रंगून जायचे. विष्णुदास भावे यांचे 'सीतास्वयंवर' हे पहिले नाटक येथून ते सुरुवात करायचे आणि विजय तेंडुलकर, जयवंत दळवी, वि. वा. शिरवाडकर, रत्नाकर मतकरी, पु. ल. देशपांडे अशा अनेक नाटककरांचा परिचय आम्हाला करून द्यायचे. त्यांच्या एकूण शिकवण्यावरून आमच्या लक्षात आले, की विभा = नाटक. विभा म्हणजे नाटक हे समीकरणच झाले. पुरुषोत्तम करंडक स्पर्धेची तयारी ते विद्यार्थ्यांकडून उत्तम प्रकारे घेत, की मॉडर्नला हमखास एखादे तरी पारितोषिक मिळे.



'विभां'चा आणि माझा गेली ४७ वर्षांचा परिचय. एक विद्यार्थिनी आणि नंतर सहकारी या नात्यांनी मी अनेक गोष्टी त्यांच्याकडून शिकले. विद्यार्थी दशेत गुरुजनांचा एक मोठा प्रभाव विद्यार्थ्यांवर असतो. आज मागे वळून पाहताना 'विभां'च्या रूपाने 'मॉडर्न'मधील मराठी विभागाची जडणघडणच दिसून येते.

१९७०-७१मध्ये मॉडर्न क. वि. वा. महाविद्यालय सुरू झाले. आजूबाजूला अनेक महाविद्यालये असतानाही केवळ शाळेच्या, संस्थेच्या प्रेमामुळे आम्ही काहीजणी मॉडर्न हायस्कूलमधून मॉडर्न महाविद्यालयात आलो. सर्व प्राध्यापक हे तरुण आणि उत्साही होते. मराठीला डॉ. भीमराव कुलकर्णी, डॉ. वि. भा. देशपांडे आणि डॉ. द. दि. पुंडे सर होते. कॉलेज तसे लहान आणि नवीन होते. बिल्डिंगचे कामही चालू होते. आमच्या वर्गात ५०-६० विद्यार्थी होते. त्यामुळे विभा आम्हाला नाटक शिकवायचे आणि त्यात रंगून जायचे. विष्णुदास भावे यांचे 'सीतास्वयंवर' हे पहिले नाटक येथून ते सुरुवात करायचे आणि विजय तेंडुलकर, जयवंत दळवी, वि. वा. शिरवाडकर, रत्नाकर मतकरी, पु. ल. देशपांडे अशा अनेक नाटककरांचा परिचय आम्हाला करून द्यायचे. एकीकडे त्यांचे पीएच.डी.चे कामही सुरू होते. ते या नाटककारांच्या गमतीजमती सांगायचे, हे सांगताना त्यांचे योगदानही सांगायला ते विसरत नव्हते. त्यांच्या एकूण शिकवण्यावरून आमच्या लक्षात आले, की विभा = नाटक. विभा म्हणजे नाटक हे समीकरणच झाले. पुरुषोत्तम करंडक स्पर्धेची तयारी ते विद्यार्थ्यांकडून उत्तम प्रकारे घेत, की मॉडर्नला हमखास एखादे तरी पारितोषिक मिळे. महाविद्यालयाच्या स्नेहसंमेलनात विभांचा उत्साह आणि त्यांनी घेतलेले परिश्रम आजही आठवतात.

विभा आम्हाला नाटकात काम करणाऱ्यांची तसेच कलाकारांचीही माहिती देत. बऱ्याच वेळा त्यांच्या तोंडून एकेरी उल्लेख यायचा आणि आम्ही मैत्रिणी म्हणायचो, 'विभांचे सर्वच मित्र आहेत की काय?' पण ही गोष्ट खरी होती.

१९८४मध्ये डॉ. भीमराव कुलकर्णी मुंबईला गेले आणि एक जागा रिकामी झाली. तोपर्यंत मी पीएच.डी. झाले होते. डॉ. रा. शं. वाळिंबे पुरस्कारही एम. ए.ला मिळालेला होता. वर्तमानपत्रातून लिहीत होते आणि दूरदर्शनवर एक बालनाट्य प्रक्षेपित झाले होते. इतक्या भांडवलावर माझी मॉडर्नमध्ये नियुक्ती झाली आणि विभांची विद्यार्थिनी असलेली मी सहकारी प्राध्यापक झाले. याची गंमत वाटायची त्या वेळी आणि सरांबद्दल असलेला



अनुक्रमणिका






कौतुकमिश्रित आदरभावही वाटायचा. आम्ही सर्वजण 'भीमराव सर', 'विभा सर' अशाच नावाने त्यांना ओळखत होतो. आज नावाने कोणी हाकही मारत नाहीत, पण 'विभा' मात्र खरोखर इतके विद्यार्थिप्रिय होते, की त्यांचे नाव शेवटपर्यंत सगळ्यांच्या तोंडी 'विभा' म्हणूनच राहिले. वस्तुतः त्यांचे नाव विश्वनाथ भालचंद्र देशपांडे. हे नाव फारसे कोणाला माहीतही नव्हते आणि नाही. एकदा एक सर त्यांना स्टाफरूममध्ये म्हणाले, "अरे विभा, तुझ्या नावाची एक बाई सध्या लिहीत आहे. आम्हाला वाटले, तूच आहेच!" तेव्हा विभा म्हणाले, "पण ती देशपांडे आहे का?" सर्वजण हसले. मला वाटते, आजही अनेक नाट्य कलावंतांच्या, समीक्षकांच्या आणि नाट्यप्रेमींच्या मनात 'विभा' हेच नाव घर करून बसले आहे.

विभांना चर्चासत्र घेणे, चर्चासत्रांना जाणे, व्याख्यानांना जाणे, नाटक पाहून त्यावर परीक्षण लिहिणे हे फार आवडत असे. मॉडर्न महाविद्यालयात त्यांच्या नाट्यप्रेमातूनच त्यांनी 'नाट्यशास्त्र पदविका' अभ्यासक्रम सुरू केला. अनेक कलावंत आणि नाट्यसमीक्षक महाविद्यालयात येत. येणारे लोकही त्यांना 'विभा'च म्हणत. विभांमुळे मोहन आगाशे, विजय तेंडुलकर, शिवाजी सावंत, पुष्पा भावे, लालन सारंग, अमोल पालेकर, जब्बार पटेल, विजया मेहता, माधव वझे, जयवंत दळवी असे अनेक दिग्गज महाविद्यालयात येऊन गेले. दर वेळी विभा प्रसन्नचित्ताने हसून सगळ्यांचे स्वागत करीत. विभांचा कार्यक्रम हा हमखास यशस्वी होत असे. हे सर्व करीत असताना विभांनी त्यांचे लेखनकार्यही सुरू ठेवले होते. 'नाटककार खानोलकर, रंगयात्रा, प्रतिमा : रूप आणि रंग' अशी किती तरी पुस्तके त्यांनी लिहिली आणि संपादित केली.

यू. जी. सी.च्या प्रकल्पातून त्यांनी परिश्रमपूर्वक 'मराठी नाट्यकोश' या बृहद् ग्रंथाची निर्मिती केली. नाट्यकोशाचे काम त्यांच्याच हातून झाले याचे कारण विभा आयुष्यभर नाटकच जगले. 'नाटक' हे त्यांच्या जीवनाचे टॉनिक होते. माधव वझे, डॉ. चंद्रशेखर बर्वे, प्रा. पुष्पा भावे आणि विभा हे समकालीन. या नाट्यप्रेमींनी मराठी नाट्यसृष्टीच्या समीक्षेला नवीन वळण दिले. आज इतके नाटकवेडे समीक्षक अपवादानेच आढळतात. या नाट्यकोशाच्या निमित्ताने विभांना प्रवासही करावा लागला; पण न थकता विभांनी हे शिवधनुष्य पेलले. अनेकांच्या मुलाखती घेणे, माहिती संकलन करणे हे जिकिरीचे कामही त्यांनी पार पाडले. आपल्या हातून नाट्यदेवतेची एक मोठी सेवा होत आहे असे एक आत्मिक समाधान त्यांच्या चेहऱ्यावर होते.

विभांना नवनवीन कल्पना सतत सुचायच्या. एकदा मला ते म्हणाले, "मी अनेक चर्चासत्रे घेतली. तू एक करतेस का?" हे एक आव्हान १९८८ साली मी स्वीकारले. 'मराठी नाटक आणि मनोविकृती' या विषयावरील चर्चासत्राला अमोल पालेकर यांच्यासह अनेक ज्येष्ठ आणि श्रेष्ठ रंगकर्मी आले होते. चर्चासत्राचे पूर्ण आयोजन मी केले. त्यांना ते आवडले असावे. कारण या चर्चासत्राचे पुस्तक करायचे ठरले तेव्हा त्यांनी मला विचारले, "हे तू करणार का?" मी 'हो' म्हटले. याचे कारण ते माझे गुरू होते आणि गुरूंना नाही म्हणायचे नाही. यामुळे विभांनी सांगायचे आणि मी 'हो' म्हणून काम करून टाकायचे, असा जणू संकेतच ठरला होता. मानसशास्त्र विभागाच्या प्रा. सुधा शाळिग्राम या विभागप्रमुख होत्या. मुळात हे चर्चासत्र आम्ही दोन्ही विभागांचे म्हणून घेतले. सर्व लेख एकत्रित करायचे, त्याला संपादकीय लिहायचे, या गोष्टी विभांमुळे मी शिकले. आणि एक दिवस 'विमल प्रकाशना'कडून फोन आला. "पुस्तक तयार झाले आहे. प्रती घेऊन जा." माझे ते पहिलेच पुस्तक. मी आणि शाळिग्रामबाई प्रकाशकांकडे गेलो. पुस्तक बघताच बाईंचा पारा चढला. मला काही कळेना. यांना कशाचा राग आला. पुस्तकावर संपादक म्हणून डॉ. स्नेहल तावरे आणि माझ्या नावाखाली प्रा. सुधा शाळिग्राम असे प्रकाशकांनी छापले. त्या माझ्या आईच्या वयाच्या. मला त्यांची समजूत कशी काढायची हे कळेना. धुसफुसतच आम्ही कॉलेजमध्ये आलो. आल्याबरोबर विभांना प्रत दाखविली. ते म्हणाले, "अरे वा, छान झाले!" मी म्हटले, "छान कसले, शाळिग्रामबाई रागावल्या आहेत. माझे नाव त्यांनी आधी छापले. सर, आता काय करायचे?" त्यावर विभा म्हणाले, "अग, तू पीएच.डी. आहेस, म्हणून प्रथमतः घातले. बरोबरच आहे." मी निःश्वास सोडला. विभांनी हा प्रश्न फार चुटकीसारखा सोडवला. मला त्यांचे कौतुकच वाटले.

पीएच.डी. डिग्री असणे म्हणजे तुमच्या हातात पासपोर्ट असल्यासारखे आहे, असे ते नेहमी म्हणायचे. मी पीएच.डी. होऊन मॉडर्नमध्ये लागल्यामुळे आम्ही सर्वजण 'डॉक्टरेट' मिळविलेले होतो याचे समाधान त्यांना होते. 'मराठी भाषा आणि साहित्य' या विषयावर विभांनी १९८७ साली एक चर्चासत्र घेतले. नेहमीप्रमाणे हे चर्चासत्र यशस्वी झाले. 'तू एक शोधनिबंध लिही,' ही त्यांची आज्ञा तत्काळ मान्य करून 'दशकातील आत्मचरित्रे' हा शोधनिबंध मी

लिहिला. या शोधनिबंधाचे जाहीर कौतुक डॉ. ह. श्री. शेणोलीकर सरांनी केले आणि डॉ. आनंद यादव सरांनी हे लक्षात ठेवले. त्यांनीच मला 'साहित्यसूची'मध्ये लेख प्रकाशित करायला सांगितले. १९९८मध्ये यादव सरांनी 'आत्मचरित्र मीमांसा' हे पुस्तक लिहिले. त्या पुस्तकाच्या 'आभार' पानामध्ये माझे नाव घालून मोलाचे साहाय्य झाल्याबद्दल आभार मानले. याचे श्रेय विभांनाच जाते. त्यांनी मला लेखन करण्यास सतत प्रवृत्त केले. आपली विद्यार्थिनी ही मोठी झाली पाहिजे, या भावनेतूनच या चर्चासत्राचे पुस्तक करायचे ठरले. तेव्हा त्यांच्या बरोबरीनेच मला संपादन करण्यास सांगितले. 'मेहता प्रकाशना'ने हे पुस्तक प्रकाशित केले. विभांमुळे माझ्या नावावर दोन पुस्तके झाली. यातूनच प्रेरणा घेऊन १९९० मध्ये माझे तिसरे पुस्तक 'स्नेहवर्धन प्रकाशना'तर्फे 'ज्ञानेश्वरी आणि विसावे शतक' हे प्रकाशित झाले. त्याचेही त्यांनी कौतुक केले. आणि ते विभागप्रमुख असेपर्यंत म्हणजे १९९७पर्यंत माझी १२ पुस्तके प्रकाशित झाली. म्हणजे मराठी विभागातील आम्ही तिघेजण– विभा, पुंडे सर आणि मी सतत लेखन करीत राहिलो.

विभांनी अभ्यास मंडळावरही काम केले. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि पुणे विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळ यांच्या निवडणुका त्यांनी लढवल्या. त्यात ते यशस्वीही झाले. महाविद्यालयाला त्यांचा रास्त अभिमान असे. मराठी अभ्यास मंडळाचे अध्यक्ष व्हावे ही त्यांची इच्छा मात्र फलद्रुप झाली नाही; पण मी जेव्हा मराठी अभ्यास मंडळाची बिनविरोध पहिली महिला अध्यक्ष झाले तेव्हा मात्र ते म्हणाले, 'चला बरे झाले तू तरी अध्यक्ष झालीस.'

एकदा एका गृहस्थांनी मला 'भाऊसाहेबांची बखर' दिली आणि ते म्हणाले, ''तुम्ही यावर सेल्फ स्टडीसारखे लिहा.'' हा अनुभव मला नवीन होता. ''बघते,'' असे मी म्हटले. ते गृहस्थ महाविद्यालयातून बाहेर पडले आणि विभा आले. माझ्या टेबलावर बखर पाहून म्हणाले, ''मंगल, काहीही लिही पण गाइड लिहू नकोस.'' मी अवाक झाले. केवळ पुस्तक पाहून यांना कसे कळले? दुसऱ्या दिवशी ते पुस्तक मी परत केले आणि विभांमुळे त्या क्षेत्राकडे मी कधीच गेले नाही. खरे म्हणजे त्या काळात नावाजलेले प्राध्यापक असे लिहीत असायचे, पण हा एक चांगला धडा माझ्यासाठी होता.

१९९७मध्ये विभा मॉडर्न महाविद्यालयातून निवृत्त झाले, पण त्यांचे नाट्यप्रेम तसूभरही कमी झाले नाही. माझ्या तीन–चार प्रकाशनांना ते आनंदाने आले होते. त्यांच्या हस्ते पुस्तकांचे प्रकाशनही मला करता आले. 'कालचक्र' या जयवंत दळवींच्या नाटकावरील त्यांची समीक्षा मी प्रकाशित केली. 'नाटक म्हणजे दृक्श्राव्य काव्य आहे' हे सूत्र तर त्यांनी मनात ठेवलेच, पण जयवंत दळवी यांच्यासारख्या वेगळ्याच जातकुळीची नाटके मराठी रंगभूमीला बहाल करणाऱ्या नाटककाराच्या नाट्यकृतीचा वेध घेताना कोणती दक्षता घ्यावी लागते, कोणती पथ्ये पाळावी लागतात याचेही मार्गदर्शन त्यांनी या पुस्तकात केले आहे.

निवृत्तीनंतरही सार्वजनिक जीवनात विभा सतत सक्रिय राहिले. नाटक पाहणे आणि त्यावर भाष्य करणे हा त्यांच्या जीवनाचा मूलमंत्र होता. ही तारेवरची कसरत करताना त्यांच्यातील सद्गृहस्थही कर्तव्यदक्ष होता. विशाखा ही त्यांची एकुलती एक मुलगी दुबईला संसारात रमली होती. मात्र, त्यांच्या पत्नीचे– ताईंचे दुःखद निधन मध्यंतरी झाले आणि हा आघात विभांना सहन करणे काहीसे अवघड झाले. मी आणि मधुरा कोरान्ने त्यांना भेटायला गेलो तेव्हाही प्रकृती जरा बरी नसते, पण मी बाहेर कार्यक्रमांना जातो, असे सांगून अतिशय भरभरून ते बोलले. मी आयोजित केलेल्या दहा आंतरराष्ट्रीय आंतरविद्याशाखीय परिषदांचे कौतुक तर त्यांनी केलेच, पण माझ्यानंतर मराठी विभाग सक्षम केलास, अशी कौतुकाची थापही दिली. आज मॉडर्नमध्ये मराठी संशोधन केंद्रात २३ विद्यार्थी संशोधन करीत आहेत. हे केंद्र मी जरी सुरू केले तरी १९९४मध्ये विभांनी पदव्युत्तर विभाग सुरू केला, हे महत्त्वाचे आहे.

माझ्या लग्नाला १९७९मध्ये विभा सपत्नीक आले होते. माझ्या दोन्ही मुलांच्या लग्नाला २००८ आणि २०१५मध्ये ते आवर्जून आले होते. अतिशय टापटिपीचे वेड असणारे, सतत कडक इस्त्रीचा झब्बा घालणारे, अक्षरांचे विशिष्ट वळण असणारे आणि शेवटच्या श्वासापर्यंत 'नाटक एके नाटक' जगणारे आमचे 'विभा सर' यांनी जगाच्या रंगमंचावरून अचानक घेतलेली एक्झिट मनाला फार चटका लावून गेली. आम्हा विद्यार्थ्यांना घडविणाऱ्या या गुरुवर्यांना भावपूर्ण आदरांजली!

◆

**डॉ. स्नेहल तावरे**
मराठी विभाग आणि पदव्युत्तर संशोधन केंद्रप्रमुख
मॉडर्न महाविद्यालय, पुणे ५
चलभाष : ९४२३६४३१३१



अनुक्रमणिका



समीक्षा

डॉ. महेश खरात

# अर्घ्य
## निर्मळ प्रेमानुभवाचा उत्कट आविष्कार

**शि**वाजी चाळक हे 'अर्घ्य' या कवितासंग्रहाचे कवी. शिवाजी चाळकांचा जन्म २७ फेब्रुवारी १९५९ सालचा. तसेच २७ फेब्रुवारी हा दिवस कुसुमाग्रजांचा जन्मदिवस 'मराठी भाषा गौरवदिन' म्हणून साजरा होत आहे. याच दिवशी शिवाजी चाळक जन्माला यावेत हे चाळकांचे केवढे मोठे भाग्य आहे. कवितासंग्रहाचे प्रकाशन १९९२ सालचे. म्हणजेच त्यांच्या वयाच्या ३३ वर्षी कवितासंग्रह प्रकाशित झाला. तोही गोवा येथील पार्वती बुक क्लबच्या वतीने. जरी वयाच्या ३३व्या वर्षी कवितासंग्रह प्रकाशित झाला असला तरी या कविता १९९२ पूर्वीच लिहिल्या गेल्या आहेत. म्हणजेच १९८०च्या आगेमागे शिवाजीराव चाळक कविता लिहीत असावेत, असे म्हणता येईल. हे एवढ्यासाठीच नमूद केले, की शिवाजीराव ज्या काळात कविता लिहीत होते तो काळ आणि त्या काळाचे सामाजिक, सांस्कृतिक संदर्भ ध्यानात घेतले, की चाळक कोणत्या काळात कविता लिहीत होते हे समजू शकते. इथे उदाहरणादाखल काही नोंदी करतो, जेणेकरून तो काळ समोर उभा राहण्यास मदत होईल. १९७१ हे जागतिक स्त्रीमुक्तीचं वर्ष म्हणून साजरे केले गेले १९७५मध्ये देशात आणीबाणी सुरू झाली १९८०मध्ये शेतकरी संघटनेचा उदय झाला. परिणामी, 'इंडिया' विरूद्ध 'भारत' असा संघर्ष उभा राहिला. १९८० नंतरच्या काळात आर्थिक धोरणात बदल होऊन उदारीकरणाची दारे किलकिली होऊ लागली होती. १९८३ साली गिरणी कामगारांचा संप झाला. त्यातून मालक विरुद्ध नोकर हा संघर्ष उभा राहिला. गॅट करार आणि १९९० नंतरच्या काळात खासगीकरण, उदारीकरण, जागतिकीकरण हे शब्द उच्चारले जाऊ लागले. या बाबींचा चाळकांच्या कवितेवर परिणाम झालेला दिसत नाही. म्हणजेच चाळकाच्या बव्हंशी कविता या व्यक्तिनिष्ठतेकडे झुकलेल्या दिसतात. समूहाचा आवाज त्यांच्या कवितेमध्ये फारसा ऐकायला येत नाही. त्याचे प्रमुख कारण हे त्यांचे त्या वेळचे वय हे असावे असे वाटते. तरुण वयात काव्यलेखनाला प्रारंभ केल्यामुळे मर्यादित अनुभवाच्या परिघाबाहेर फारशी झेप घेता येत नाही. अर्थात, हे या संग्रहातील कवितेला लागू पडते.





कवीला व्यक्तिगत जीवनात आलेले बरे-वाईट अनुभव जेव्हा तो शब्दांकित करतो, तेव्हा त्या अनुभवाकडे तो कसा पाहतो, अनुभवाला तो तटस्थवृत्तीने भिडतो का, का आत्मपरतेच्या आहारी जातो, या बाबींवर कवीची कविता चांगली वाईट ठरत असते. आत्मपरतेच्या अंगाने काव्यलेखन करूनही विश्वभान प्रकट करणारे कवी मराठीत आहेत, त्याअर्थी मराठीची फार भव्य दिव्य परंपरा आहे. अशा ज्या समृद्ध देशी परंपरा भारतीयांना प्रेरणा, अस्मिता, स्वाभिमान आणि आनंद देत राहिल्या, त्यातील सर्वांत महत्त्वाची वाङ्मयीन गोष्ट म्हणजे काव्यपरंपरा होय. या काव्यपरंपरेत अनेक कवींनी, महाकवींनी काव्यलेखन केलेले आहे. ज्ञानेश्वरांपासून तुकोबापर्यंत, तुकोबापासून जोतिबापर्यंत, केशवसुत ते मर्ढेकर; कुसुमाग्रज, करंदीकर, चित्रे, कोल्हटकर, सुर्वे, ढसाळ अशी एक समृद्ध परंपरा कवींनी निर्माण केली आहे. ही परंपरा आनंद देत राहते, प्रेरणा देत राहते, जगण्याचे बळ देत राहते. या परंपरेच्या

**शिवाजीराव चाळक हे आपल्या अंतरंगाने आपल्या क्षमतेनुसार रंगछटा निर्माण करणारे कवी आहेत. त्यांचा काव्यलेखनाचा परीघ भलेही छोटा असेल, पण तो प्रामाणिक आहे, सच्चा आहे. त्यांच्या काव्यातून खरेपणाचा आवाज ऐकायला मिळतो, हे मला महत्त्वाचे वाटते. कवीचा स्वानुभव कवितेत असतो, हे प्रमेय सर्वांना मान्य होण्यासारखे आहे. हा अनुभव भावानुभव असतो. घेतलेल्या अनुभवापैकी काही अनुभवांबद्दल कवीला काही तरी सांगायचे असते.**




संस्कारावर तयार झालेले असंख्य कवी आपापल्या मगदुराप्रमाणे काव्यलेखन करीत आले आहेत. त्यातील काहींची मराठी समीक्षकांनी, अभ्यासकांनी दखल घेतली, तर काहींची कविता उपेक्षित, दुर्लक्षित राहिली. काहींची विस्मृतीत गेली, तर काहींची नोंदसुद्धा झाली नाही. असे असले, तरी प्रत्येक युग आपली कविता आपल्या पद्धतीने लिहीत असते. प्रत्येक कवी आपल्या अंतरंगाने वेगळी छटा निर्माण करीत असतो. शिवाजीराव चाळक हे आपल्या अंतरंगाने आपल्या क्षमतेनुसार रंगछटा निर्माण करणारे कवी आहेत. त्यांचा काव्यलेखनाचा परीघ भलेही छोटा असेल, पण तो प्रामाणिक आहे, सच्चा आहे. त्यांच्या काव्यातून खरेपणाचा आवाज ऐकायला मिळतो, हे मला महत्त्वाचे वाटते. कवीचा स्वानुभव कवितेत असतो, हे प्रमेय सर्वांना मान्य होण्यासारखे आहे. हा अनुभव भावानुभव असतो. घेतलेल्या अनुभवापैकी काही अनुभवांबद्दल कवीला काही तरी सांगायचे असते. ते सांगायचे कसे, हा प्रश्न कवीला पडत असतो. म्हणजेच निर्मितीच्या वेळी कसे सांगायचे, काय सांगायचे अन् कोणाबद्दल सांगायचे, हे प्रश्न त्याच्या मनाच्या तळाशी कुठे तरी रेंगाळत असतात. मग तो आविष्काराच्या कोणत्या तरी पद्धतीची निवड करीत असतो. त्याची निवड ही खास त्याची असते, असे म्हणत असले तरी त्यात अनुकरणाच्या, संस्काराच्या, सामाजिकतेच्या या संस्कृतीच्या बऱ्या-वाईट छटा, दृष्टिकोन, हेतू, गृहितके कमी-अधिक प्रमाणात, दृश्य किंवा अदृश्य रूपात मिसळलेली असतात. त्याची अभिव्यक्ती ही भावानुभवाच्या एकत्रित परिणामाचा परिपाक असते. तो कवी व्यक्त होण्यासाठी त्याच्या प्रकृतिधर्मानुसार हव्या त्या पर्यायाची निवड करतो. भावानुभाव सौंदर्यशोधक दृष्टीने व्यक्त करताना काव्यात्म उंची प्राप्त व्हावी, ही त्या कवीची आंतरिक गरज असते. ही गरज स्वस्थं बसू देत नाही, अस्वस्थ करते. कारण निर्मितीचा क्षण संपला की कवीसुद्धा वाचकाच्या भूमिकेत उरत असतो. कवी शिवाजीराव चाळक आज याच भूमिकेत असावेत असे दिसते. या संग्रहातील ५१ कविता त्यांच्या वयाच्या विशी ते तिशीतील असाव्यात असे दिसते. म्हणजे पहिली कविता विशीत लिहिली असली, तर या संग्रहात समाविष्ट केलेली शेवटची कविता तिशीतील असण्याची शक्यता आहे. कवितेच्या खाली निर्मितिकाल लिहिण्याची एक अत्यंत चांगली सवय विंदा करंदीकरांना होती. अशी सवय चाळकांना असती तर कोणत्या वेळी त्यांनी कोणती कविता लिहिली हे समजू शकले असते. शिवाय पहिल्या कवितेपासून शेवटच्या कवितेपर्यंत आपणाला एक क्रमाने विकसित होणारी रेषा ओढता आली असती, जेणेकरून चाळकांची कविता समजण्यस मदत झाली असती.

तारुण्यात प्रेमाबद्दलची अनिवार ओढ मनात असते. प्रेमामध्ये असे काही तरी असते की ज्यामुळे दोन भिन्नलिंगी एकमेकांना जोडले जातात. ही भावना जेवढी नैसर्गिक आहे तेवढीच ती शारीरिकही आहे. प्रेमामध्ये असे काही तरी असते की मनाला हुरहुर लावणारी ऊर्जा त्यात साठवलेली असते. नव्हे, असतेच. माणूस प्रेमात असला की कवी नसणारा माणूसही शब्दांशी चाळा करायला लागतो. जर तो संवेदनशील मनाचा अन् कवी असेल तर त्याच्या प्रतिभेला अंकुर फुटलेले दिसतात. ऐन तारुण्यात ज्या भावना मनात घर करून राहतात, त्या भावनांमध्ये समाज, देश, संस्कृती तर असतेच, पण या त्याबरोबरच प्रेम नावाची अडीच अक्षरी संवेदना अधिक प्रबळ असते. ही संवेदना चाळकांच्या मनातही होती. तिच्याबद्दलची ओढ रेखाटताना शिवाजीराव तिच्या सौंदर्याने भारून गेले आहेत. मेख मारल्यासारखे खिळवून ठेवण्याचे तिच्या ठिकाणी सामर्थ्य आहे. त्या दृष्टीने 'सौंदर्याची सांगता' ही कविता महत्त्वपूर्ण आहे. तिची केसाची बट, तिची तर्जनी, तिची नजर, तिचा पदर, तिच्या पैंजणातील मंद चाल, तिचे भव्य

कपाळ यातून तिचे सौंदर्य ते अचूक शब्दकळेत उभे करतात.

शेवटी ते लिहितात, की

*'तुझ्या सौंदर्याची सांगता*
*पूर्ण करी माझी कविता'* (पृ.१८)

यातून तिला निरखण्याचे कसब दिसतेच, पण तिच्या सौंदर्याला माझ्या कवितेशिवाय पूर्णत्व येणार नाही, ही भावना गडद होताना दिसते. सूर्योदय या कवितेत धरती सूर्याला मित्र, प्रियतम समजते. चाळक लिहितात, की

*'आला तो एकदाच*
*गात शौर्यगाथा*
*प्रियतम धरतीचा*
*तिला लाभला आता'* (पृ.१७)

पृथ्वी आणि सूर्य यांच्यामधील प्रेमभाव हळुवारपणे तिच्या प्रीतीत चिंब चिंब भिजण्याची इच्छा तीव्र होते. ही इच्छा पूर्ण करशील का, असा प्रश्न ते उपस्थित करतात; पण ते प्रश्न विचारून थांबत नाहीत, तर प्रीतिसाठी प्रेमाची याचना करतात. सुमनास भ्रमर लाभले. त्याप्रमाणे अखंड जळो प्रीतज्योत ही त्यांची धारणा बनते. मग मी चंद्र आणि तू चांदणी होऊन प्रीतीरूपी सागरात विहार करण्याची मनीषा ते बाळगतात. पण हे स्वप्न वास्तवात येऊ शकले नाही याची सल 'अखेरची भेट' या कवितेत व्यक्त झाली आहे.

*'ऐकण्यास मी उत्सुक होतो*
*तुझे ते गोड गोड बोल*
*विरहाचे ते शब्द ऐकून*
*शेवटी मीच झालो अबोल*
*विरहाचा तो जिवंत अग्नी*
*माझ्या मनी तेवत आहे*



**काही क्षण कवीच्या आयुष्यात असे येतात की त्यांचा प्रेमावरचा विश्वास उडून जातो. प्रेम हा जुगार आहे, याची माहिती असतानासुद्धा तो जुगार कवी खेळतो. कवीच्या पदरी निराशा येते. हरलेपणाच्या जखमा न दाखविण्याचा कवी प्रयत्न करतो. 'माझ्या वाट्याला जरी प्रेमभंगाचे दुःख आले असले तरी त्याच्याशी तू इमान राख,' असा चांगला सल्लाही कवी देतो. कवी अगदी रक्तबंबाळ होतो.**

व्यक्त होतो. या प्रसंगी कुसुमाग्रजांची 'पृथ्वीची प्रेमगीत' ही कविता आठवते. प्रेमिकेकडे पाहताना कवी स्वतःला विसरून जातो. त्या दृष्टीने 'कळेना कसा मी' ही कविता ध्यानात घेण्यासारखी आहे.

*'तुला पाहताना*
*लाटांची उशी*
*भावनांची कुशी*
*तुला पाहताना*
*तुला पाहताना*
*विसरलो स्वतःला*
*कळेना कसा मी*
*तुला पाहताना'* (२३)

तिला पाहताना कवीला स्वतःचाही विसर पडतो, कसा विसर पडतो हे कळत नाही. मात्र, पडलेला विसर काही क्षणांनंतर का होईना, कवीच्या ध्यानात येतो आणि ती भावना कवी कवितेतून व्यक्त करतात. मग कवीचे अश्रू गोठतात, स्वप्नं भंगतात, पावलांना आधार मिळत नाही, प्रीतीचा हवा तो साद मिळत नाही. पण कवीच्या मनी

*विरहाचा भ्रमर मला*
*सदा पोखरतो आहे'* (पृ.२६)

अशी स्वतःला आतून सदैव पोखरत असणारी भावना ते रेखाटतात. आपल्या आणि प्रेमिकेच्या वाटा वेगळ्या झाल्या त्याबद्दलची जाणीवही चाळक व्यक्त करतात. ज्या ठिकाणाहून वाटा वेगळ्या झाल्या तिथपर्यंतच्या आठवणी, स्मृती हृदयाशी कवटाळीत बसण्यातच खरे जीवन आहे. हा अनमोल ठेवा मनाच्या तळाशी ठेवून उर्वरित आयुष्य जगायचे आणि जीवन सुंदर करण्याचा ते विचार करतात. काही क्षण कवीच्या आयुष्यात असे येतात की त्यांचा प्रेमावरचा विश्वास उडून जातो. प्रेम हा जुगार आहे, याची माहिती असतानासुद्धा तो जुगार कवी खेळतो. कवीच्या पदरी निराशा येते. हरलेपणाच्या जखमा न दाखविण्याचा कवी प्रयत्न करतो. 'माझ्या वाट्याला जरी प्रेमभंगाचे दुःख आले असले तरी त्याच्याशी तू इमान राख,' असा चांगला सल्लाही कवी देतो. कवी अगदी रक्तबंबाळ होतो. 'माझ्यातच मी' नावाची कविता फारच महत्त्वाची वाटते. चाळक लिहितात–

*'१० एप्रिलची दुपार*
*पाऊण वाजला होता*
*अर्थातच*
*बारा वाजून गेले होते*
*माझेही...*
*समोर बसलीस माझ्या*
*आणि प्रश्न केलास*
*पाहिलेत का त्यांना?*
*ते पायऱ्या चढतात ना*
*तेच ते.* (पृ.३०)

असं असतानाही कवी स्वतःला त्यांच्या ठिकाणी कल्पून पाहतात. प्रेमभंगाच्या तडाख्यातून तावून-सुलाखून निघाल्यानंतर चाळक मात्र वास्तवाकडे स्वतःच्या जगण्याच्या सीमा निश्चित करतात.

*तू सुवर्णकंचुकी मागावी*
*मी कांचनमृगाची शिकार करावी*
*तू रावणाला भिक्षा घालावी*
*फक्त लक्ष्मणरेषेपर्यंत* (पृ.३१)

संसाराच्या चक्रात अडकलेल्या माणसाची व्यथा उलगडताना 'तू दूर जाताना असह्य व्हावे, दोन अश्रू गाळावेत फक्त मुक्तीपर्यंत' अशी मध्येच एखादी अध्यात्मजाणिवेने भरलेली ओळ येते.

शिवाजी चाळक यांच्या कवितेचे केंद्र प्रेम हे असलं तरी या केंद्राच्या परिघावर कुटुंब आहे, नातेसंबंधातील ताणतणाव आहेत; पण हे ताणतणाव टोकाचे नाहीत, तर ते त्यांनी संयतपणे व्यक्त केले आहेत. झाडावरील कावळ्याला पाहून सासरी गेलेली नववधू मुराळ्याची वाट बघत बसते. सत्यवानाच्या सावित्रीगत नवऱ्याच्या सुखासाठी सर्वस्वी आनंदी असणारी पत्नी दिसते. त्यांच्या कवितेतील सासू सुनेवर मायेची पाखरण करते. जाऊ, नणंद, दीर जीव लावतात. मग सासरी गेलेली ही नववधू भारावून जाते. आई तर विश्वाची छाया आहे. ती एकमेव अनेकपात्री भूमिका करणारी जन्मदात्री आहे. आई-वडील हे झाडासारखे असतात. ते कळ्यांना, फुलांना जन्म देतात. कळ्या व फुले झाडांना विसरले तरी झाड मात्र आपला गुणधर्म विसरत नाही. या संदर्भातील झाड आणि फूल कविता महत्त्वाची वाटते.

दुसऱ्याच्या कपाळावर कपाळ घासून दैव चोरता येत नसते. आपले नशीब आपल्यालाच बनवायचे असते. असा प्रयत्नवादी स्वर 'नशीब' नावाच्या कवितेत ऐकायला मिळतो. म्हणून भविष्य ऐकण्यासाठी ज्योतिष्याची गरज नाही, असे कवीला वाटते. स्वतःच्या कार्यावर विश्वास ठेवणारा हा कवी पायाच्या दगडाप्रमाणे स्वतःला गाडून घेण्याची भाषा करतो. सुंदरसे आणि भक्कम शिल्प उभे राहण्यासाठी पायातल्या दगडाचे कार्य मौलिक स्वरूपाचे असते. याचे दर्शन 'पायाचा दगड' या कवितेतून होत राहते. याशिवाय 'जीवनमार्ग', 'जागृत राहिलेच पाहिजे', 'एक दिवस', 'आरसा', 'एक संध्याकाळ' या कवितांतून त्यांची जगण्याकडे, जीवनाकडे पाहण्याची दृष्टी समजते.

चाळकांची आणखी एक कविता मला महत्त्वाची वाटते. ती 'उपासक' नावाची आहे. ही कविता मला अनेक अर्थांनी महत्त्वाची वाटते. कारण या कवितेतून ते स्वतःचा दृष्टिकोन मांडतात. ते फक्त दृष्टिकोन मांडून थांबत नाहीत, तर जगण्याचे नेमके सूत्र काय आहे ते सांगतात. जे कमकुवत आहेत, उपेक्षित आहेत, कमजोर आहेत, हरलेले आहेत, सुखापासून कोसो दूर आहेत, त्यांच्या बाजूने उभे राहण्याची ते भाषा करतात, जीवनाच्या प्रवासात स्वतःबरोबर जे जे आहेत त्या सर्वांना बरोबर घेऊन जायचे आहे. सर्वांच्या प्रति पुढे जाण्याची, सर्वांच्या कल्याणाची चिंता यातून व्यक्त होते. सत्तेची, संपत्तीची मिजास मिरवणारी आभाळाएवढी उंच माणसे असतील तर मी त्यांच्या समोर वाकणार नाही, पण जमिनीवर अहोरात्र चालत राहणाऱ्या मुंगीसाठी मी नम्र होईन. मी कुबेराचासुद्धा गुलाम होणार नाही; पण सत्याचा, न्यायाचा व समतेचा गुलाम होईन. म्हणजे समतेच्या वाटेवरून चालताना सर्वांच्या कल्याणाचा विचार करणारा नम्र उपासक होईन. ही कविता म्हणजे मला वाटते, सर्वांच्या प्रति चांगली भावना ठेवणाऱ्या शिवाजी चाळक यांच्या मनाचा आरसाच आहे. या आरशात शिवाजी चाळक यांच्या जगण्याचा पोत कशा प्रकारचा आहे हे पाहता येते. त्यांना पौर्णिमेचे चांदणे नको, अमावस्येचा अंधार हवा. सूर्याचे उगवणे नको, सूर्याचे मावळणे हवे. झाडाची छाया नको, रखरखणारे ऊन हवे. ज्योतीचा प्रकाश नको, ठेचाळणारा रस्ता हवा. उमललेली कळी नको, सुकलेली लता हवी. अशा भाववेलीवर त्यांची कविता जन्म घेते. चांदणे, उगवणे, छाया, प्रकाश, उमललेली या शब्दांत सर्वसाधारण माणूस सुख शोधत असतो. या सुखासाठी माणूस तरसलेला असतो; पण ही सुखे माणसाच्या जीवनात सहज येऊ शकत नाहीत. कुणाचे चांदण्यात भिजायचे राहून जाते, तर कुणाच्या आयुष्यात अंधारच पेरलेला असतो. कुणी उमलत्या कळीसाठी आसुसलेला असतो... पण नेमक्या याच गोष्टी शिवाजी चाळक यांना नको आहेत. उलट,

अमावास्येचा अंधार, मावळणारा सूर्य, रखरखणारे ऊन, ठेचाळणारा रस्ता आणि सुकलेली लता या गोष्टी चाळकांना हव्या आहेत. लोखंडाला भट्टीत घालून तप्त केल्याशिवाय लोखंड हव्या त्या सुंदर आकारात येणार नाही. या प्रखर वास्तवाची कवीला जाणीव असल्यामुळेच दुःखाच्या जागा कवीला प्रिय वाटतात. अशा द्वंद्वातून चाळकांची कविता साकार होते. मग वसंतातले बहरून यावे. शरदातले चांदणे ल्यावं आणि मदनाचं कवित्व गावं, अशी एकदम दुसरे टोक गाठणारी निर्मिती ते करतात. रामकृष्णातले देवत्व, वल्लभाचे अधिष्ठान आणि कर्णाचे अर्घ्यदान हे अनंताशी नाते सांगणारा खरा मार्ग आहे. माझे सुख, माझा आनंद, तूच एक परमानंद आहे. हा परमानंद कवितेतून मिळतो. 'जीवनअर्घ्य' या कवितेत चाळक लिहितात, की

*'जरी आहे कृतघ्न मानव*
*उपयोगी मी पडत आहे.*
*त्याच्याच कायेबरोबर*
*मी सोबत करणार आहे* (पृ. ६४)

माणसामध्ये कतृघ्नपणा असला तरी त्याला दूर लोटू नये. त्याच्याबरोबर जगून जीवन सुंदर करण्यातच खरे जीवन आहे. असा फारच उदात्त आणि निर्मळ विचार शिवाजी चाळक करीत आहेत. ही त्यांची विचारधारा वयाच्या तिशीपर्यंतचीच आहे. आज ते सार्वजनिक जीवनात निर्मळ मनाचे सहित्यप्रेमी रसिक, कवी म्हणून परिचित आहेत. त्यांच्या येणाऱ्या नव्या काव्यसंग्रहासाठी शुभेच्छा!

◆

**संदर्भ** : शिवाजी चाळक, अर्घ्य, पार्वती बुक क्लब, गोवा, प्रथम प्रकाशन, १९९२

**डॉ. महेश खरात,**
मराठी विभागप्रमुख व सहयोगी प्राध्यापक,
विनायकराव पाटील महाविद्यालय, वैजापूर
चलभाष : ९४२३४५३४३७, ७३८५९४८६२४



पुस्तक परीक्षण

डॉ. सौ. अमृता मराठे

# बखर एका सारस्वताची






**आत्मचरित्र लेखन हे अजाणतेपणाने करता येत नाही. वाङ्मयीन अभिरुचीचे आणि वाङ्मयीन नवनिर्मितीचे निकष या लेखनाची महत्ता सिद्ध करणार असतात. हे आत्मचरित्रकाराने स्वीकारलेले आव्हान असते. ते ज्या ताकदीने तो पेलेल तितक्या उंचीवर त्याची वाङ्मयीन कलाकृती जाईल. डॉ. न. म. जोशी यांनी लिहिलेली 'बखर एका सारस्वताची' म्हणजे न. म. यांनी त्यांचा साधलेला आनंदयोग हा वाचकांचा भाग्ययोग बनून जातो, हे अत्यंत मनमोकळेपणाने मान्य करावेसे वाटते.**



आत्मचरित्र म्हणजे एखाद्याने स्वतःच्या जीवनाविषयी वस्तुनिष्ठता, प्रामाणिकता आणि प्रांजलता राखून लिहिलेला इतिहास. History of one's life written by oneself.

हा जीवनेतिहास असतो आणि तो स्वतः लिहिलेला असतो. हा इतिहास लिहिताना लेखकाने स्वतःच्या जीवनानुभवांवर, जीवनात घडलेल्या घटनांवर, स्वतः अनुभवलेल्या प्रसंगांवर टाकलेला प्रखर असा प्रकाशझोत असतो. हा प्रकाशझोत असतो त्याच्या जीवनविकास प्रक्रियेतून प्राप्त झालेल्या चिंतनशीलतेतून लाभलेल्या वैचारिक आणि भावनिक अशा समंजसपणाचा, हा प्रकाश असतो या समंजसपणाला लाभलेल्या प्रतिभा आविष्कारक्षमतेचा.

आपण जे अनुभवले, भोगले, काही स्वीकारले, काही सोडून दिले, काही अपेक्षित– त्याहीपेक्षा जे काही अनपेक्षित असे भाग्य वाट्याला आले ते जसे असेल तसे शब्दशक्तीच्या साहाय्याने वाचकांसमोर मांडणे हे आत्मचरित्रकाराने स्वीकारलेले व्रत असते.

आत्मचरित्र हा सर्वांत कठीण आणि गुंतागुंतीचा वाङ्मयप्रकार असतो. कारण आत्मचरित्र लेखन हे अजाणतेपणाने करता येत नाही. वाङ्मयीन अभिरुचीचे आणि वाङ्मयीन नवनिर्मितीचे निकष या लेखनाची महत्ता सिद्ध करणारे असतात. हे आत्मचरित्रकाराने स्वीकारलेले आव्हान असते. ते ज्या ताकदीने तो पेलेल तितक्या उंचीवर त्याची वाङ्मयीन कलाकृती जाईल.

डॉ. न. म. जोशी यांनी लिहिलेली 'बखर एका सारस्वताची' म्हणजे न. म. यांनी त्यांचा साधलेला आनंदयोग हा वाचकांचा भाग्ययोग बनून जातो, हे अत्यंत मनमोकळेपणाने मान्य करावेसे वाटते.

डॉ. न. म. जोशी अर्धशतकाहून अधिक ग्रंथसंपदेचे निर्माते-लेखक आहेत. साहित्यकारणातल्या मुरब्बी नमंना सरस्वतीच्या कृपाप्रसादाने शिक्षणकारणातही उच्चस्तरीय मान्यता प्राप्त झालेली आहे. विद्यार्थिप्रिय शिक्षक म्हणून ते साने गुरुजींच्या पंगतीतले आहेत. त्याहीपेक्षा, साने गुरुजींची 'धडपडणारी मुले' नमंना शिक्षणक्षेत्रात तत्त्ववेत्ता, चिकित्सक, समाजशास्त्राचा गाढा व्यासंग करणारा प्रयोगशील शिक्षक म्हणून वेगळीच ओळख देतात.

'बखर एका सारस्वताची' हे ६१५ पानी आत्मचरित्र त्यांच्या नावापासूनच वाचकालां ओढ लावून जाते. आत्मचरित्र हा इतिहास असला, तरी तो बखरकाराच्या कल्पना व लेखनस्वातंत्र्याचा पुरस्कर्ता आहे. बखर- खबर म्हणजे बातमी, वार्ता. वार्ताहर जसा एखादी घटना, बातमी वर्तमानपत्राच्या पहिल्या पानावर झळकेल अशी ठसठशीत, उठावदार



अनुक्रमणिका






होण्यासाठी आपले लेखनकौशल्य पणाला लावतो, ते कौशल्य नमंच्या लेखनात पानोपानी प्रदर्शित होताना दिसते. इतिहासापेक्षा बखरकार होणे त्यांना रुचलेले दिसते.

पुस्तकाच्या नावात 'एका' या शब्दातून लेखक नमंना आपले अनुभव हे सर्वसामान्य अशा पातळीवर नेऊन ठेवता आले आहेत. लेखकाची विनयशील नम्रवृत्ती इथे प्रकट होते. आपण कोणी असामान्य, अद्वितीय व्यक्ती नाही, तर चारचौघांसारखे सामान्य समाजातून जीवनाची वाटचाल करणारे आहोत, असे सांगून ते सामान्य वाचकांना आपलेसे करतात. 'सारस्वत' या शब्दाने सरस्वतीच्या उपासकाची असलेली आपली भूमिका ते दृढ करतात.

'विद्येनेच मनुष्या आले श्रेष्ठत्व या जगामाजी।
न दिसे एकहि वस्तू विद्येनेहि असाध्य आहे जी।।'

या सुभाषिताची सार्थकता पटविणारे हे नमंचे आत्मचरित्र! या विद्येसाठी ज्यांनी जग दाखविले, आसरा दिला, जीवनध्येय दृष्टिपथात आणले ते आई, दादा, नाना, ताई, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे आणि सारे वाचक यांच्याविषयी आपल्या मनातील जिव्हाळा, आपुलकी, आदर, कृतज्ञता व्यक्त करताना न.म. म्हणतात, 'तुम्ही सारे माझा झरा अमृताचा' असे म्हणून या सर्वांना ते आपली बखर समर्पित करतात.

त्यांनी या बखरीमध्ये आठ योग उलगडून दाखविले आहेत. त्यांची नावेही श्रीमद् भगवद्गीतेतील विविध योगनामांवरून ठेवलेली आहेत.

नमंनी पहिल्या दैवयोगात आपली कुळकथा सांगितली आहे. गारवडे गावाचा परिसर रेखाटताना त्यांच्या गावातील तृषार्तांची तहान भागविणाऱ्या रामकृष्ण साने यांची थोरवी 'झरी' नावाच्या रमणीय पाणवठ्यासारखीच शीतलता देऊन जाते. कुलपटासह ते आजोबांचे कार्य वर्णन करतात. कोल्हटकर, आगरकर घराण्याची सोयरीक टिपून जातात. प्रेमळा दादा आजोबा, तांबडे लुगडे नेसणारी विठा आजी, पुण्यपावन बनू आजी, कष्टाळू चिमा आजी अशी व्यक्तिचित्रं न.म. त्यांच्या खास नाट्यमय संवादात्मक वर्णनशैलीतून रेखाटतात. वाटते, ही सारी माणसे आपल्या अवतीभवती वावरत आहेत. या सर्वांमध्ये अविस्मरणीय ठरते ती साऱ्यांचा आधारवड ठरलेली 'ही स्वाभिमानी इनामदारीण उत्तर आयुष्यात तडफेनं उभी राहिली'. ती आई- त्या आईच्या व्यक्तिमत्त्वात नमंना साने गुरुजींची श्यामची आई आणि झाशीची राणी लक्ष्मीबाई, सत्यवानाची सावित्री, इब्सेनची नोरा दिसते. अशा मातापित्यांच्या आठवणीत रमताना न.म. किती सहजपणे या स्वभावचित्रांचे विश्लेषण करून जातात! ही त्यांची मर्मग्राही लेखनशैली.

आत्मचरित्रकार हा स्वतःच्या जीवनाचा भाष्यकार असतो. या भाष्याला आधार असतो सत्यनिष्ठ अशा माणुसकीचा!

१९४८ साली विस्कळीत झालेले कुटुंब १९५२ साली 'केसरीवाड्यात तीन मुलांसह आई-वडील एकत्र जेवलो,' हे सांगताना नियतीच्या इच्छेने होणारे संयोग-वियोग 'अरे हरी, चिऊचा काऊ तो माझा भाऊ- आई, आक्का या दोघी मैत्रिणींचं अद्वैत ते आवर्जून सांगतात. न. म. त्यांच्या वैयक्तिक कौटुंबिक जीवनाला कॅलिडोस्कोप म्हणतात. या कॅलिडोस्कोपसारखी गणगोतांची नाती. लहान, मोठी अशी ते नोंद करून ठेवतात, ती प्रेक्षणीय अशीच.

दुसऱ्या ज्ञानयोगामध्ये विद्येसाठी करावी लागलेली वणवण ते वर्णन करून जातात. सातारा, गारवडे, डांबरवाडी का सोलापूर, अशा कैचीत मॉडर्न हायस्कूल (सोलापूर) निश्चित झाले. हरिभाऊ देवकरण हायस्कूल, ला. ना. सार्वजनिक हायस्कूल (जळगाव), सिटी हायस्कूल (सांगली), शि. प्र. मंडळी शारीरिक शिक्षण महाविद्यालय, स. प. महाविद्यालय, टिळक शिक्षण महाविद्यालय, आंग्लभाषा प्रशिक्षण संस्था (मुंबई), राष्ट्रीय एकात्मता योजना- गांधी धामापर्यंत सिंधी आत्मसात करून एम. ए., एम. एड., पीएच.डी. झालेले न.म. ऐरणीवर घातलेला हिरा तेजाळून उठावा तसे झळाळून उठले. एकाच दिवशी सकाळी इंग्रजीमध्ये, महिला मंडळात हिंदीमध्ये, सायंकाळी महाराष्ट्र मंडळात मराठीमध्ये आणि रात्री सिंधी समाज सभेत सिंधीमध्ये अस्खलित भाषण करणारे 'वक्ता दशसहस्रेषु' असे शोभले, झळाळून दिसले.

शिक्षणाचा हा ज्ञानयोग नमंना सामाजिक-राजकीय स्वातंत्र्याच्या कालखंडाचा ऐतिहासिक दस्तावेज मिळावा तसा गावापासून ते राजधानीपर्यंत सारा समाजशास्त्राचा गाभा भरभरून देऊन गेला तो मुळातूनच वाचायला हवा.

नमंच्या या बखरीमध्ये सर्वांत मोठा कालखंड आहे कर्मयोगाचा. हा त्यांच्या आत्मचरित्राचा गाभा आहे, असे म्हटले तर वावगे ठरणार नाही. २५५ पाने (६१५ पैकी) या कर्मयोगाने व्यापली आहेत.

या कर्मयोगाला प्रारंभ होतो आर. एम. हायस्कूल, मिरजेपासून. पहिल्याच थांब्यावर नमंची ओळख झाली संगीतकार राम कदमांशी. मिरजेच्या पद्धतीप्रमाणे 'नम्या', 'हऱ्या' नावाने ओळखले जाणारे न.म. हरेक कामात वाकबगार झाले होते. मग पुण्याला सरस्वती मंदिर शाळेत पार्टटाइम नोकरीनंतर आयडियल इंग्लिश स्कूल, न्यू इंग्लिश



**सरांच्या लेखनाला वेग आला तो 'झाली भली पहाट', 'हलकल्लोळ', 'रोगी-डॉक्टर यम', 'जगणारी माणसं', 'बिनखात्याचा मंत्री' अशा एकांकिका; नाटिका आणि फार्सिकल नाटक लेखनाने. 'जेव्हा देव अवतरतात', 'मशाल', 'तेजस्विनी', 'नंदनवास'सारख्या मुलांसाठी आणि पुरुषपात्रविरहित अशा एकांकिकांबरोबरच 'निश्चयाचा महामेरू', 'दत्तक राजपुत्र' या नाटकांबरोबरच 'फत्तेवाडीचा झुंजार' हा एकपात्री प्रयोगही रंगभूमीवर नमंनी स्वतः आणला.**

स्कूल, (टिळक रोड), मॉडर्न हायस्कूल, (शिवाजीनगर), भावे स्कूल (पेरूगेट), आदर्श विद्यालय (नातूबाग), भारत इंग्लिश स्कूल (शिवाजीनगर), नू. म. वि. प्रशाला (पुणे) असे दहा शाळांचे पाणी चाखून न.म. नूमवि परिवाराचे एक जबाबदार आणि आवडते सदस्य बनले होते.

या कर्मयोगाबरोबरच ऋग्वेदाच्या उपवेदासारखा आयुर्वेदासारखा एक उपयोग 'संसारयोग' सरांच्या जीवनात अवतरला. सरांना खऱ्या अर्थाने आशाताईंच्या रूपाने 'गृहिणी सचिवः सखी मिथः प्रिय शिष्या ललिते कलाविद्यौ।' लाभली. मित्रसंघर्ष असो की मुख्याध्यापकांचा मेमो असो, एकता मासिकाचे संपादन असो, म.सा.प.ची कार्यकारिणी असो, नाही तर टिळक शिक्षण महाविद्यालयामध्ये इंग्रजी- मराठी माध्यमाची भिन्न संस्कृती पेलणे असो किंवा आशाताईंच्या कार्यालयात जाऊन त्यांच्या रजेच्या अर्जाची मंजुरी मिळवणे असो, शवागारातील थरार अनुभवणे असो, किंवा पीएच. डी.चा अफाट पसारा सांभाळण्यामध्ये अर्धांगिनी असूनही त्या नमंचा उजवा हात बनून राहिल्या होत्या हे खरे.

ग्रंथालय निधी उभारणीमध्ये सिंहाचा वाटा घेऊन टिळक कॉलेजचा सुवर्ण महोत्सव संपन्न होण्यासाठी जबाबदार भूमिका पार पाडली ती नमंनी. 'चणे खावे लोखंडाचे, तेव्हा ब्रह्मपदी नाचे।' याची प्रचिती सरांनी नानाविध अनुभवांच्या कसोटीतून घेतली.

आपला पुत्र चि. प्रसाद कर्तासवरता झाल्यानंतर सौ. आशाताईंच्या रुग्णसेवेचा 'फ्लॉरेन्स नाइटिंगेल' व्रताचा समारोप स्वेच्छा निवृत्तीने झाल्यानंतर नमंनी आपला सारा मोकळा वेळ साहित्यसेवेला अर्पण केला. त्यांच्याच शब्दांत 'फिटे अंधाराचे जाळे, झाले मोकळे आकाश' अशा आत्मानंदी रंगून जाणारे लेखन त्यांनी सातत्याने केले. समाजऋणातून अंशतः उतराई होण्यासाठी चित्पावन शांडिल्यगोत्री जोशी कुलाचा कुलवृत्तान्त या १४५६ पानी बृहद् ग्रंथाला प्रस्तावना लिहिली. महर्षी शांडिल्य प्रतिष्ठान या संस्थेला जनाधार आणि अर्थाधार मिळवून देऊन नमंनी 'बेरजेचे राजकारण करावे, माणसे तोडू नयेत.' हे स्वतःच्या कार्याने पटवून दिले.

नमंनी हजारो व्याख्याने, चर्चासत्रे, परिसंवाद केले. त्या त्या वेळी त्यांच्यातला एक मिस्कील वक्ता जागा असे. म्हणूनच एम. एड., एम. फिल. आणि पीएच.डी.च्या संशोधनातला फरक सांगताना ते प्रचंड हशा पिकवू शकले.

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संगोपन व प्रशिक्षण परिषदेत (S.C.E.R.T.) कृतिसंशोधन, नवोपक्रम, कृतिसत्रे, चर्चासत्रे यामध्ये सातत्याने ३० वर्षे ते विषयतज्ज्ञ व्याख्याते, मार्गदर्शक, परीक्षक म्हणून कार्यरत राहिले. ही त्यांची सामाजिक बांधिलकी!

तळेगावच्या शिक्षिका श्रीमती अपर्णा रायरीकर, प्रा. आबणे, मुंबईच्या प्राचार्या ॲना फर्नांडिस, प्रा. गंधे, नीलिमा तिखे आणि मोहन कांबळे हे नमंच्या मार्गदर्शनाने शिक्षणक्षेत्रातली सर्वोच्च पीएच.डी. मिळवणारे बिनीचे शिलेदार आहेत.

त्याहीपुढे जाऊन कित्येक विद्यार्थ्यांनी 'नमं'चे साहित्य 'न.म. एक साहित्यिक' म्हणून त्यांच्या साहित्याच्या अभ्यासाने पीएच. डी. मिळविली आहे.

निवृत्त होताना गारवड्याच्या हरी जोशीचे रूपांतर सुप्रसिद्ध साहित्यिक आणि शिक्षणतज्ज्ञ डॉ. न. म. जोशींमध्ये करणाऱ्या टिळक शिक्षण महाविद्यालयाला अखेरचा दंडवत घालण्यामागे नमंच्या मनातील कृतज्ञता, ज्ञानसंस्थेचा गौरवच व्यक्त होताना दिसतो.

व्याख्यानांचे दौरे, स्नेहसंमेलने, पुस्तक प्रकाशन, वर्धापनदिन, गौरव समारंभांचा मुक्तपणे आनंदोत्सव साजरा करणारे 'योगः कर्मसु कौशलम्।' असे अस्सल बावनकशी 'कर्मयोगी' पाहायचे तर कर्मयोगच वाचावा लागेल.

चौथ्या क्रमांकाच्या भक्तियोगात न.म. रंगलेले दिसतात. गारवड्याच्या रामजन्मोत्सवातील लोहारबुवांच्या कीर्तन श्रवणात, पुण्यामध्ये कुलदैवत नृसिंहदर्शनात खंड पडू न देणारे न.म. पंढरपुरी कळसाचे दर्शन घेणारे ज्ञानी भक्त ठरतात. गाणगापूरला सौ. आशाताईंच्या तपस्येमुळे निर्गुण पादुकांचे आयते दर्शन घेणारे न. म., शांताबाई गोखल्यांच्या वाड्याजवळ प्रा. संगोरामांशी गप्पा मारताना

'दासगणू का फासगणू' हे उद्गार खिडकीत उभे राहून ऐकणारे दासगणू महाराज, शांताबाईंच्या सांगण्यावरून दासगणूंना साष्टांग नमस्कार घालणारे न.म. त्यांच्या पारदर्शक वृत्तीमुळे आपलेसे वाटतात. तसेच गोविंदराव खुरसुडे (सिद्धराज टेलर्स) या श्रद्धाळू हितचिंतकाचे मन मोडू नये, या हेतूने अखंड तीन दिवस स्वामी समर्थांच्या पोथीचे वाचन करतात आणि तिसऱ्या दिवशी एकता मासिकाचे कार्यकारी संपादक म्हणून १०० रु. पगाराची नोकरी स्वीकारतात. पत्रकारनगरात विशेष सवलतीत सदनिका प्राप्त करून घेतात. एम. ए.साठी नोकरी (बिनपगारी रजा) दुय्यम ठरविणारे न.म. त्यांच्या ध्येयवादाने परमेश्वरकृपेस पात्र ठरतात हेच खरे!

न.म. प्रारंभीच्या महाविद्यालयीन शिक्षणकालात घरोघर वर्तमानपत्रे टाकता टाकता नृसिंह मंदिरात चाललेल्या प्रवचनांचा पंधरा मिनिटे लाभ घेऊन आपल्या ज्ञानात भर घालत असत. 'ममत्वम्। तव अहम्। सोऽहम्।' आपुलकी, शरणभाव आणि अद्वैत या तीन भक्तीच्या पायऱ्या ज्या गणेशशास्त्री जोशींच्या प्रवचनाने समजल्या, त्याच गुरुजींच्या सत्कारासाठी अध्यक्ष होण्याचा हा गुरुप्रसाद नमंना मिळाला.

माणिकनगरला पाच खारकांचा प्रसाद घेऊन येणारे न.म. औंढ्या नागनाथक्षेत्री भेटलेल्या मुलाने 'शून्यापेक्षा कोणतीही रक्कम जास्त असते ना!' संपूर्ण कुटुंबाची जबाबदारी पेलणारा हा मुलगा पुण्याला शिकायला नेणे शक्य नाही, हे नमंना एका अंतर्दृष्टीने पाहणाऱ्या समाजहितचिंतकाला पटते. 'शिर्डीला शे-शंभर लोकांना ओलांडून साईबाबांचे दर्शन घेणारे न.म. कंडक्टरच्या कृपेने कसेबसे बसच्या आत शिरून पुण्याच्या प्रवासाला लागतात,' हे वर्णन करणारे न.म. स्वतःच स्वतःच्या जीवनाचे भाष्यकार आहेत हेच सिद्ध होते.

डोळस भक्तीबरोबर डोळस समाजचिंतन, आत्मचिंतन हे नमंच्या जीवनाला अर्थपूर्णता प्राप्त करून देते.

सारस्वताच्या या बखरीत आलेला 'विषादयोग' हा अर्जुनाचा विषाद नाही, तर वय, अनभव, अधिकार, संपत्ती यांच्या अभावामुळे नमंना जाणवणारी आगतिकता, त्यांची होणारी भावनिक कुतरओढ यामुळे आलेला हा विषाद आहे.

नारायणाचे दैव असे खडतरच होते. रमणबाग न्यू इंग्लिश स्कूलमधून काढून टाकणे, अंबरनाथ ट्रेनिंग अर्धवट सोडणे, कोल्हापुरात कामात लक्ष नसणे, नीरेजवळ चक्क बुवाबाजी करणे, साताऱ्याला नंदूकडे असताना टी.बी. होणे, काही दिवस आळंदीला राहणे, भाऊ या नात्याने नमंनी आश्रय देणे, गारवड्यात रामाची सेवा करण्यासाठी राहणे, दारूच्या आहारी जाणे, शेवटी विदर्भात जळंब गावी रेल्वेलाइनवर उभे राहून जीवन संपवणे इ... अशी बुद्धिमान चलाख भावाची चित्तरकथा! त्याच्या जीवनातला मीना योग नमंचा विषादयोग ठरला!

नमंना भेटलेला एक शिक्षक, कलावंत मित्र हा त्यांचा विषाद वाढवणाराच ठरला. इतका विषाद, की नमंच्या चारित्र्यहननाचा प्रयत्न करणारा हा खरा मित्र कसा म्हणावा?

आप्तस्वकीयांच्या बाबतीत हे जीवघेणे अनुभव नमंना जीवनाकडे वस्तुनिष्ठ दृष्टीने पाहायला शिकवून गेले असेच म्हणावे लागेल. त्यांच्या आईने त्यांच्यासंबंधी व सुनेसंबंधी गैरसमज करून घेतला होता. सासू सुनेला एकच वाक्य बोलली. अतिशय बोलके असे वाक्य होते ते : 'तू तुझ्या बापाला असं वागवलं असतंस का?' यावरूनच कळून येते नमंवर कोणता प्रसंग गुजरला असेल ते.

सहा दशके शिक्षण क्षेत्रात घालवताना आवडत्या विद्यार्थ्यांचा काळाने घेतलेला घास ('अभिनेता मोहन गोखले यांचं निधन!') सरांच्या काळजावर चरे उमटवून गेला, तर महाडिक ऊर्फ यशवंत दत्तसाठी हॉस्पिटलमध्ये थालीपीठ नेणे, 'चिंटू'फेम प्रभाकर वाडेकरांसारखा तारा निखळणे... माधव चव्हाण, अरुण जोशी ऊर्फ 'नबी', सहकारी मा. वि. जोशी, अशा आवडत्या व्यक्तींच्या निधनाने नमंच्या विषादात भरच घातली.

नमंच्या बखरीमध्ये सहावा योग आहे ज्येष्ठ-श्रेष्ठ व्यक्तींच्या भेटीचे प्रसंग रेखाटलेला 'विभूतियोग'. इ.स. १९४४ साली नमंच्या हार्मोनियम वादनाने प्रसन्न होऊन बालगंधर्वांनी चांदीच्या वाटीतला खडीचा चमचा भरवून 'मोठा हो' असा आशीर्वाद देणे. कर्मवीर भाऊरावांनी स्वतःच्या पाण्याचे भांडे पुढे करणे, राक्षसासारखे वाटणारे अण्णाभाऊ साठे भेटणे आणि त्यांनी गारवड्याचा रस्ता दाखवणे, राक्षसातला माणूस दिसणे, यशवंतराव चव्हाणांनी ''गारवड्याच्या एक जोशीबाई मला अठ्ठेचाळीस साली भेटल्या होत्या... मोठ्या जहाँबाज बाई! त्या तुझ्या कोण?'' ''ती माझी आईच!'' अशी नमंना आठवण सांगणे; ग.दि.मा., पु. भा. भावे यांचे मैत्र, सुधांशूंनी ओळख करून देणे, 'खूष झाले तर भोळा सांब आणि रागावले तर जमदग्नी' असे असे म्हणणारे ग. दि. मा., तसेच लोककवी मनमोहन, स्वातंत्र्यवीर सावरकरांनी दिलेली शाबासकी, सुधीर फडक्यांच्या घरचे जेवण; अटलबिहारी वाजपेयी, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, राजकपूर

यांनी नमंच्या शब्दाखातर 'भारतीय चित्रपटसृष्टीचा इतिहास' या केसकरांनी भरवलेल्या प्रदर्शनाचे प्रमुख पाहुणे म्हणून येणे; गो. नी. दांडेकरांनी अगत्यपूर्वक पाहुणचार करणे, पं. भीमसेन जोशींना कराडला पोचवणे, विठाबाई नारायणगावकरांनी 'बगा पावणं, मुका घेतोय हितं असलेल्याचा!' असे म्हणून अकरा वर्षांच्या नमंचा मुका घेणे, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी वृत्तपत्र पोऱ्याच्या वेषातल्या नमंकडून केसरी विकत घेऊन दोन आणे किमतीचा पेपर असताना रुपया देऊन १४ आणे पुस्तके आणण्यासाठी नमंना देणे; विजय फळणीकर, सरोजिनीबाई यांच्याबरोबर हेमा मालिनींनी "जोशीजी हमारे प्रोफेशनमें हम गुरुओंकी बहुत संभावना करते हैं, उनके प्रति आदर रखते हैं। आप तो गुरुणां गुरु हैं।" असे म्हणून नमस्कार करण्याचे कारण सांगणे. राजदत्त, चंद्रकांत गोखले, सरपोतदार आशा काळे, रामभाऊ म्हाळगींपासून ते श्रीरंग संगोरामांसारख्या विभूतींच्या सहवासाने आपले जीवन समृद्ध झाल्याची पावती नम्र न.म. देऊन जातात.

'अक्षरब्रह्मयोग' हा या बखरीतला सातवा योग. आईच्या ओव्या आणि बापू आजोबांच्या रात्रभर चालणाऱ्या भजनांनी शब्दांशी मैत्री आणि अक्षरांशी संवाद सुरू झालेल्या नमंनी शालेय जीवनात सुंदर निबंध लिहिले. निरीक्षण, वाचन, चिंतन, मनन या प्रक्रियेत स्वतःला गुंगवून टाकले. वृत्तपत्रे वाचता वाचता नमंनी कथालेखनाचा टप्पा गाठला. 'दुहिता मी जनकाली' ही पहिली कथा स्वराज्यात छापून आली. 'आसावरी', 'आधारवड' लिहिता लिहिता य. ग. जोशींच्या मार्गदर्शनाने कथावाचन आणि कथालेखनाच्या प्रांतात मुसंडी मारली. आणि कथानायकांचा शोध घेणारे मन 'साहेब शून्यापेक्षा कोणतीही रक्कम जास्त असते ना!' हे जीवनाचे तत्त्वज्ञान सांगणारा मुलगा नमंना उद्याचा द. वा. पोतदार वाटला.

सरांच्या लेखनाला वेग आला तो 'झाली भली पहाट', 'हलकल्लोळ', 'रोगी-डॉक्टर यम', 'जगणारी माणसं', 'बिनखात्याचा मंत्री' अशा एकांकिका; नाटिका आणि फार्सिकल नाटकलेखनाने. 'जेव्हा देव अवतरतात', 'मशाल', 'तेजस्विनी', 'नंदनवास'सारख्या मुलांसाठी आणि पुरुषपात्रविरहित अशा एकांकिकांबरोबरच 'निश्चयाचा महामेरू', 'दत्तक राजपुत्र' या नाटकांबरोबरच 'फत्तेवाडीचा झुंजार' हा एकपात्री प्रयोगही रंगभूमीवर नमंनी स्वतः आणला.

म. गांधी जन्मशताब्दीनिमित्त 'प्रेषित' ही चरित्रात्मक कादंबरी त्यांनी लिहिली, आणि ती लिहिताना नमंना सहन करावे लागलेले मनस्ताप, 'कादंबरीचे नाव 'मोहनदास









करमचंद' ठेवण्यापर्यंत आलेले अनुभव मुळातूनच वाचायला हवेत. त्याचप्रमाणे 'निःस्पृह' ही रामशास्त्री प्रभुणे यांच्यावर लिहिलेली कादंबरी. तिचे प्रकाशन, सुचलेला शेवट 'रामशास्त्र्यांची भिकबाळी' राखेत सापडणे, यशवंतराव चव्हाणांनी केलेले कौतुक आणि त्या कादंबरीच्या संदर्भांनी साकार झालेली शिल्पाकृती... अक्षरब्रह्मयोगातले हे नवल आहे!

बालसाहित्यकार म्हणून नमंनी लिहिलेली बडबडगीते 'मर्दानी झाशीवाली', 'जगज्जेता सिकंदर', 'आर्य चाणक्य', मूल्यशिक्षणविषयक कथा, पर्यावरण कथा, २९ सूत्रांचा 'बिष्णोई पंथ', 'पाखरांची शाळा', 'बजरबट्टू', 'होमी भाभा', 'मौलाना आझाद', 'डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन', 'म. अण्णासाहेब कर्वे', 'जनरल अरुणकुमार वैद्य', नमंनी लिहिलेल्या बोधकथा, त्यातील 'आत्मारामपंत वझे', 'पं. भीमसेन जोशींविषयीच्या कथा म्हणजे नमंच्या 'कथानम्'चे दिव्यदर्शन होय. स्वातंत्र्यकथा, पत्रकारांच्या शिक्षणविचारांची मर्मग्राही मांडणी यातून नमंच्या व्यक्तिमत्त्वातील आणि व्यासंगी, अभ्यासक विद्वान दृष्टीसमोर जिवंत होतो. नमंनी केलेले स्फुटलेखन, त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावना साहित्यक्षेत्रातले न.म. हे सहस्रार्जुन आहेत असेच म्हणावे लागेल. अर्जुनासारखे सव्यसाची आणि हजारोंच्या संख्येतील लहान-मोठ्या लेखांनी नटलेल्या साहित्यसंपदेचा कळस म्हणजे 'ज्ञानेश्वरी संहिता', 'श्रीमत् भगवत् गीतासंहिता', 'मराठी गद्य अन्वयार्थ', इंग्रजी अन्वयार्थ यांचे संपादन', 'गीता ज्ञानदेवी' हा सुवर्णकळस आहे. उत्कृष्ट साहित्य रसिक वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे माध्यम म्हणजे अनुवाद. कवी मनमोहन नातू यांच्या 'शव हे कविचे जाळु नका हो!' या कवितेच्या अनुवादाने नमंनी सिंधी भाषेवरही मातृवत प्रेम केले, हेच प्रत्ययाला येते.

लेखनाबरोबरच त्यांची 'वक्ता दशसहस्रेषु' ही भूमिका वठविताना बहिःशाल व्याख्यानांसाठी आडगावी वावरताना आलेले जीवघेणे अनुभवसुद्धा नमंमधील रसिक आस्वादकाचा रसरशीतपणा नमंनी कसा टिकविला होता, असेच पटविणारे लेखन केले आहे. शि. प्र. मंडळीला तत्कालीन पंतप्रधान मोरारजीभाई देसाईंची भेट, महाराष्ट्र साहित्य परिषदेत शाहिरी परिषद घडविणे, आंतरभारतीसाठी काम करणे, एकता मासिकाचे संपादनकार्य; अनेक स्मरणिका, गौरव ग्रंथ, नियतकालिके यांसाठी लेखन हा एकच ध्यास, हाच श्वास मानून नम लिहीत राहिले, बोलत राहिले.

या सर्वांची फलश्रुती झाली नमंना मा. राष्ट्रपती शंकर दयाळ शर्मांच्या हस्ते गौरवपूर्वक पारितोषिक प्राप्त झालेल्या सन्मानाने.

आपला सारा फुरसदीचा वेळ देऊन बालकुमार साहित्य संमेलनाचे कार्यकर्ते, अध्यक्ष आणि विश्वस्त या नात्याने आपली भूमिका वठविणारे न.म. त्यांच्या अक्षरब्रह्मयोगातून वाचकांच्या मनाचे सिंहासन काबीज करतात.

नमंच्या बखरीतला शेवटचा योग आहे आनंदयोग. आनंदयोग म्हणजे नमंचे जीवन! 'रंगुनी रंगात साऱ्या, रंग माझा वेगळा!' असा हा आनंदयोग. बहुलेश्वराच्या बनात शेंगा-गुळासह रंगलेल्या गप्पा, निशाचर कट्टा, नर्मदेश्वर भुवनमधील चहा, बाळ सहस्रबुद्धे यांच्या वाड्यातला 'मटार उसळीचा कार्यक्रम', पं. भीमसेन जोशींनी गायिलेले 'लक्ष्मीस्तोत्र', लक्ष्मीने दिलेला कौल, वाघाला-हत्तीला पुरणपोळी खाऊ घालणाऱ्या पुरुषोत्तम जोश्यांचा केलेला पाठलाग, पाषाणकट्टा, दि. बा. मोकाशींचे दुकान, सरन्यायाधीश चंद्रचूड, अरविंद गोखल्यांच्या बरोबर नर्मदेश्वर भुवनमध्ये अमृततुल्य चहा घ्यायला येणे. विद्याधर पुंडलीक- (पोपटी चौकट) सायकलवरून येणे, दबडघाव आणि श्री. पु. गोखले यांचे सुखद अनुभवांचे क्षण; पुरोहित टेलर्स, बादशाही हॉटेल, स. प. मित्रमंडळ, देशपांडे बुक स्टॉल हे सगळे आनंदकट्टे हे रणरणत्या उन्हातही सुखद झुळकांचा स्पर्श करणारे नमंचे जीवनगाणे होय.

या सर्वांना उबदार बनवणारी नमंची जन्मकुंडली आणि बखरीच्या पुढील-मागील पानावरील प्रसंगचित्रे या बखरीला सत्याधार देणारी छायाचित्रे या सर्वांसह 'न.म. : बखर एका सारस्वताची' आपल्यासमोर येऊन सांगत आहेत. असा प्रत्यक्षदर्शी अनुभव देणारा अजोड आत्मचरित्रात्मक ग्रंथ!

नवोदित लेखक, कवी, सामाजिक कार्यकर्ते, बालांपासून उच्चविद्यापीठीय विद्यार्थी, व्याख्याते आणि शिक्षक सर्वांना मार्गदर्शन करणारे, जीवनचिंतन करायला लावणारे, सर्वांशी हितगुज करणारे नमंचे हे मनोहारी रूप असेच तळपत राहो, तेजाळत राहो! अजोड अशी साहित्यकृती निर्मात्या नमंना धन्यवाद!

◆

**डॉ. सौ. अमृता ह. मराठे**
ओ ६०७, पिनाक मेमरीज,
फेज २, कोथरूड, पुणे ३८.
चलभाष : ९५९५६७१२७०



अनुक्रमणिका





मुलाखत

प्रभा सोनवणे

# ह. ल. निपुणगे

## उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचा ध्यास

पुष्पक प्रकाशनाच्या 'ज्ञानेश्वर आणि कबीर' या प्रा. कृ. ज्ञा. भिंगारकर यांच्या ग्रंथाला महाराष्ट्र राज्य शासन तसेच पुणे नगर वाचन मंदिर, ज्ञानप्रबोधिनी निगडी व इतर असे एकूण सहा पुरस्कार मिळाले आहेत. वेगवेगळ्या विषयांवरील पुस्तके प्रकाशित करणे हे पुष्पक प्रकाशनाचे वैशिष्ट्य आहे. कल्पकतेमुळे निर्माण झालेली पुस्तकें म्हणजे 'साहेब' ही उद्धव ज. शेळके यांची आचार्य अत्रे यांच्या जीवनावरील कादंबरी. तसेच 'देवाची पाउले' ही ग. दि. माडगूळकर यांच्या जीवनावरील रवींद्र भट यांनी लिहिलेली कादंबरी.



पुण्याच्या प्रकाशन व्यवसायातील एक उल्लेखनीय नाव ह. ल. निपुणगे यांचे पुष्पक प्रकाशन! निपुणगे यांचा जन्म घोडेगावचा. प्राथमिक शिक्षण मंचर येथे झाले. १९५० साली व्हर्नाक्युलर फायनलच्या परीक्षेसाठी ते पुण्यात आले आणि पुढील काळात पुणेकर झाले. १९५४मध्ये एस. एस. सी.पर्यंतचे शिक्षण घेऊन त्यांनी शिक्षणाला पूर्णविराम दिला व अर्थार्जनासाठी ते नोकरी करू लागले.

या सजग प्रकाशकाची जडणघडण कशी झाली हे निपुणगे यांनी 'हलचल' या आपल्या आत्मचरित्रात सविस्तरपणे लिहिले आहे. निपुणगे प्रकाशन व्यवसायात तसे योगायोगानेच आले. पण एकदा या व्यवसायात पडल्यानंतर प्रकाशकाची तीक्ष्ण नजर, गुणग्राहकता, निरक्षीरविवेकबुद्धी हे त्यांच्या ठायी असलेले गुण त्यांना विशेष उपयोगी पडले असे दिसून येते.

ह. ल. निपुणगे आणि त्यांच्या सुविद्य पत्नी कवयित्री शीला निपुणगे या उभयतांशी माझा प्रथम परिचय सज्जनगडावर झाला. १९९१ साली 'काव्यशिल्प' या कवींच्या संस्थेची सहल सज्जनगडावर गेली होती. मी नुकतीच 'काव्यशिल्प'ची सभासद झाले होते. आम्हा कवी-कवयित्रींबरोबर प्रसिद्ध लेखक रवींद्र भट व प्रकाशक ह. ल. निपुणगे होते. एक सुजाण संपादक आणि प्रकाशक म्हणून मी निपुणगे यांना २५-२६ वर्षे ओळखते आहे. प्रदीर्घ काळ प्रकाशन व्यवसायात असलेल्या निपुणगे यांना मी पहिला प्रश्न विचारला-

**तुम्ही प्रकाशन व्यवसायात किती साली आणि कसे आलात? तसेच तुम्ही प्रकाशित केलेले पहिले पुस्तक कोणते?**

- १ जून १९६३ला मी 'पुष्पक प्रकाशन' ही संस्था स्थापन केली. मला साहित्याची आवड असल्यामुळे मी व्हीनस प्रकाशनमध्ये नोकरी धरली होती. तेथे मी प्रकाशन व्यवसायाचे व्यवस्थापन शिकलो. 'व्हीनस'मध्ये मला बऱ्याच गोष्टी शिकायला मिळाल्या. त्यानंतर मी 'व्होरा आणि कंपनी' या मुंबईतील मोठ्या प्रकाशक कंपनीत नोकरीला लागलो. या कंपनीचा पुण्यात मराठी विभाग होता. तेथे मी पुस्तकनिर्मितीची सर्व जबाबदारी पार पाडली. मुद्रितशोधन करण्यापासून संपूर्ण पुस्तक तयार होईपर्यंत सर्व कामाचा मी 'व्होरा आणि कंपनी'त अनुभव घेतला. त्या काळातच मी रास्ता पेठेत एक वाचनालय चालविले. वाचनालयातून आर्थिक फायदा फारसा झाला नाही; पण बाजारात कोणत्या पुस्तकांना मागणी आहे, वाचकांना कोणती पुस्तके आवडतात हे समजले. प्रकाशन व्यवसाय सुरू करताना हे अनुभव उपयोगी पडले. मी



अनुक्रमणिका




प्रकाशित केलेले पहिले पुस्तक म्हणजे चित्रकलेच्या शिक्षकांना उपयुक्त असे म. ग. पातकर यांचे 'रेखन आणि लेखन' हे होय.

**ललित वाङ्मयाकडे तुम्ही कसे वळलात?**

- 'रेखन आणि लेखन' या पुस्तकानंतर शेती शाळेच्या विद्यार्थ्यांसाठी तु. ग. तेली यांचे 'अभिनव शेतकीशास्त्र' हे पुस्तक प्रकाशित केले. त्यानंतर मात्र मी प्रामुख्याने ललित वाङ्मयाचीच निवड केली. उद्धव ज. शेळके यांच्या 'अगतिक', 'अनौरस', 'साहेब' (आचार्य अत्रे यांच्या जीवनावरील कादंबरी), गो. गं. पारखी यांची 'बन्सीभैया' ही कादंबरी (याच कादंबरीवर 'सांगते ऐका' हा गाजलेला सिनेमा निघाला.) ललित वाङ्मयाची पुस्तके प्रकाशित करण्याची सुरुवात चांगली झाली. चांगल्या साहित्यिकांची चांगली पुस्तके करता आली, करवून घेता आली.

**इतर उल्लेखनीय पुस्तके...**

- उल्लेखनीय पुस्तके म्हणाल, तर ह. मो. मराठे यांच्या 'पक्षिणी' या कथासंग्रहाला महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. ह. मों.च्या 'मधलं पान' या आत्मकथनाला रणजित देसाई आणि पुणे मराठी ग्रंथालय असे दोन पुरस्कार मिळाले. 'पहिला चहा' (भाग १ व २) हे ह. मो. मराठे यांचे 'पुढारी'मध्ये गाजलेले स्फुट लेख दोन भागात प्रकाशित केले.

पुष्पक प्रकाशनाच्या 'ज्ञानेश्वर आणि कबीर' या प्रा. कृ. ज्ञा. भिंगारकर यांच्या ग्रंथाला महाराष्ट्र राज्य शासन तसेच पुणे नगर वाचन मंदिर, ज्ञानप्रबोधिनी निगडी व इतर असे एकूण सहा पुरस्कार मिळाले आहेत. वेगवेगळ्या विषयांवरील पुस्तके प्रकाशित करणे हे पुष्पक प्रकाशनाचे वैशिष्ट्य आहे. कल्पकतेमुळे निर्माण झालेली पुस्तके म्हणजे 'साहेब' ही उद्धव ज. शेळके यांची आचार्य अत्रे यांच्या जीवनावरील कादंबरी. (या कादंबरीच्या ५००० प्रती काढल्या होत्या.) तसेच 'देवाची पाउले' ही ग. दि. माडगूळकर यांच्या जीवनावरील रवींद्र भट यांनी लिहिलेली कादंबरी (या कादंबरीच्या ४००० प्रती काढल्या).

क. दि. सोनटक्के या सिद्धहस्त कथालेखकाच्या 'पापो नावाचे प्रकरण' हा कथासंग्रह प्रकाशित केला. त्याला महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. तसेच राजेंद्र बनहट्टी आणि बबन पोतदार यांचे कथासंग्रही प्रकाशित केले.

अनेक चरित्रे-आत्मचरित्रे प्रकाशित केली. 'वळचणीचे पाणी' - बाळ गाडगीळ, 'काटेरी फुलोरा'- वि. द. वागळे, 'आठवणींचा बटवडा' (या पुस्तकाला मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचा आत्मचरित्रासाठीचा विशेष पुरस्कार मिळाला.) - द. भा. करंदीकर तसेच स्वतः ह. ल. निपुणगे यांचे 'हलचल' ही आत्मचरित्रे, तसेच 'स्वरांजली' ही अनेक हिंदी चित्रपटांची १५० गाजलेली गाणी असलेली (२० पुस्तके) संगीताच्या नोटेशन्सची, संगीताच्या अभ्यासकांना उपयुक्त अशी पुस्तके प्रकाशित केली. 'स्वरांजली'च्या पुस्तकांचा हा चांगला यशस्वी प्रयोग ठरला व ही पुस्तके खूप लोकप्रिय झाली. या पुस्तकांच्या प्रत्येकी ३००० प्रतींच्या ५-६ आवृत्त्या निघाल्या. ही उल्लेखनीय पुस्तके म्हणता येतील.

अनेक कथासंग्रह, कादंबऱ्या, बालसाहित्य, कवितासंग्रह, व्यक्तिरेखा संग्रह, प्रवासवर्णन असे विपुल साहित्य पुष्पक प्रकाशनने प्रकाशित केले आहे.

**इतकी असंख्य पुस्तके तुम्ही प्रकाशित केली. यापैकी तुमचे आवडते पुस्तक कोणते?**

- आवडतं पुस्तक म्हणजे उद्धव ज. शेळके यांची 'साहेब' ही कादंबरी. त्याचा खपही बऱ्यापैकी झाला. चरित्रात्मक कादंबरीला त्या काळात एकूणच चांगला उठाव होता. नामवंत व्यक्तींच्या जीवनचरित्रावरील कादंबऱ्या अनेकांनी लिहिल्या आणि त्या आपापल्या परीने



अनुक्रमणिका



**प्रकाशन व्यवसायाला जोडून 'विशाखा' या दिवाळी अंकामुळे जास्त समाधानी आहे. १९६५ साली राजा फडणीस यांनी 'विशाखा' हा दिवाळी अंक सुरू केला होता. १९८२ साली विशाखाचे संपादकपद आणि मालकी हक्क माझ्याकडे आले. पहिली एक-दोन वर्षे मीही ठरावीक साच्याचे संपादन केले; पण पुढील काळात 'विशाखा'ने स्वत:चे वेगळेपण आणि विशिष्ट दर्जा प्रस्थापित केला. विशाखाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मुखपृष्ठावर सर्रास दिवाळी अंकाप्रमाणे स्त्रीचे चित्र न टाकता अलीकडच्या काळात प्रसिद्ध पुरुषाचे छायाचित्र टाकण्यात येते.**

गाजल्याही. चरित्रात्मक कादंबरीच्या बाबतीत एक महत्त्वाचा प्रश्न नेहमी उद्‌भवतो तो असा, की ही कादंबरी कोणामुळे खपली? लेखकामुळे की ज्या व्यक्तीच्या जीवनावर ही कादंबरी आहे त्या व्यक्तीमुळे? 'साहेब' या कादंबरीची कल्पना मी स्व. उद्धव ज. शेळके यांना आमची जेव्हा मुंबईत भेट झाली तेव्हा बोलून दाखवली. आम्ही दोघेही नव्या विषयाच्या शोधात होतो. मला आचार्य अत्रे यांचे प्रभावी व्यक्तिमत्त्व जाणवत होतेच. मी त्यांना हा विषय सुचवला. त्यांनीही फारसा विचार न करता होकार दिला. ही ५०० डेमी पृष्ठांची कादंबरी त्यांनी अवघ्या आठ महिन्यांत लिहून पूर्ण केली. कारण ते पूर्णवेळ लेखक होते. प्रकाशन समारंभ मॅजेस्टिकच्या गच्चीवर आम्ही केला. त्या काळी ही कादंबरी खूप गाजली. ५००० प्रती काढल्या. त्यातल्या ३००० प्रती सवलतीच्या दरात विकल्या गेल्या. नंतरच्या २००० प्रती यथावकाश खपल्या. चित्रकार सुभाष अवचट यांचे मुखपृष्ठ या कादंबरीला लाभले होते.

**हल्ली पैसे देऊन पुस्तक काढण्याचे प्रमाण वाढले आहे. त्यामुळे साहित्याचा दर्जा घसरला आहे का?**

- मला असे वाटते, नव्या लेखकांना संधी मिळण्याचा तो राजमार्ग आहे. अनेक मोठ्या लेखकांनीही आपापले पहिले पुस्तक स्वखर्चाने काढल्याची उदाहरणे आहेत. आम्हीच प्रकाशित केलेली सुशीला संकपाळ यांची 'कसरत' ही आत्मचरित्रात्मक कादंबरी हेही त्याचे एक उदाहरण आहे. ही कादंबरी चांगली झाली आणि त्यानंतर या लेखिकेची अनेक छोटी-मोठी पुस्तके प्रकाशित झाली.

साठ ते सत्तरच्या दशकातील पुस्तक प्रकाशन प्रक्रिया आणि आजची प्रकाशन प्रक्रिया यात अनेक बदल झाले. त्याबद्दल सांगा...

त्या काळातले छपाईचे तंत्रज्ञान आणि आजचे तंत्रज्ञान यात खूप बदल झाले आहेत. त्या काळात खिळ्यांची अक्षरे जुळवून, काळी शाई वापरून प्रेसमध्ये छपाई होत. असे ते खूप जिकिरीचे आणि किचकट काम होते. आधुनिक काळात कॉम्प्युटरमुळे डी.टी.पी.ने छपाई करणे सोपे आणि सुबक झाले आहे. आधुनिक तंत्रज्ञानामुळे पुस्तकनिर्मितीचा दर्जा सुधारला. विक्री कमी झाली तरी दर्जेदार पुस्तके निर्माण होत आहेत.

**इंटरनेट, ई-साहित्य यांच्यामुळे प्रकाशन व्यवसायावर काय परिणाम झाला?**

ई-साहित्यामुळे हार्ड बाऊंड पुस्तकांच्या विक्रीवर



**कविवर्य ग्रेस व ज्येष्ठ साहित्यिक भालचंद्र नेमाडे यांच्या सहित्याचा आढावा घेणारे दिवाळी अंक प्रकाशित करून या दिग्गज कवी व लेखकांचे दिवाळी अंकांतील समीक्षा लेख यांचे संकलन करून 'ग्रेस' व नेमाडे यांच्यावर दोन स्वतंत्र पुस्तके प्रकाशित केली. विशाखा दिवाळी अंकाने साहित्यजगतात मानाचे स्थान मिळविले आहे.**



परिणाम झाल्याचे जाणवल्याशिवाय राहत नाही. ई-बुकवर पुस्तके वाचली जात असल्यामुळे हार्ड कॉपी विकत घेऊन वाचण्याचे प्रमाण कमी झाले आहे.

**प्रकाशन व्यवसायात समाधानी आहात का?**

फार खूष नसलो तरी समाधानी आहे. प्रकाशन व्यवसायाला जोडून 'विशाखा' या दिवाळी अंकामुळे जास्त समाधानी आहे. १९६५ साली राजा फडणीस यांनी 'विशाखा' हा दिवाळी अंक सुरू केला होता. १९८२ साली विशाखाचे संपादकपद आणि मालकी हक्क माझ्याकडे आले. पहिली एक-दोन वर्षे मीही ठरावीक साच्याचे संपादन केले. पण पुढील काळात 'विशाखा'ने स्वतःचे वेगळेपण आणि विशिष्ट दर्जा प्रस्थापित केला.

विशाखाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मुखपृष्ठावर सर्रास दिवाळी अंकाप्रमाणे स्त्रीचे चित्र न टाकता अलीकडच्या काळात प्रसिद्ध पुरुषाचे छायाचित्र टाकण्यात येते. सिने-नाट्य व साहित्य क्षेत्रातील नामवंत पुरुषांनी 'विशाखा'च्या मुखपृष्ठावर मानाचे स्थान मिळवले आहे. अमोल पालेकर, रत्नाकर मतकरी, व्ही. शांताराम, त्याचप्रमाणे नाना पाटेकर यांच्या मुखपृष्ठाच्या अंकात त्यांच्या कारकीर्दीचा आढावा घेणारी पुरवणी टाकली गेली. तसेच कविवर्य ग्रेस व ज्येष्ठ साहित्यिक भालचंद्र नेमाडे यांच्या सहित्याचा आढावा घेणारे दिवाळी अंक प्रकाशित करून या दिग्गज कवी व लेखकांचे दिवाळी अंकांतील समीक्षा लेख यांचे संकलन करून 'ग्रेस' व नेमाडे यांच्यावर दोन स्वतंत्र पुस्तके प्रकाशित केली. विशाखा दिवाळी अंकाने साहित्यजगतात मानाचे स्थान मिळविले आहे. तसेच अनेक वर्षे गृहिणी आणि कृषिवल या डायऱ्या मी प्रकाशित केल्या. या डायऱ्यांनीही मला चांगला हात दिला.

**अनेक वाङ्मयसंस्थांवर तुम्ही पदाधिकारी म्हणून काम पाहिले. त्याविषयी काही सांगा.**

मी याज्ञवल्क्य आश्रमाच्या व्याख्यानमाला चिटणीसपदी सहा वर्षे काम केले. पुणे नगर वाचनाच्या कार्यकारिणीवर होतो. महाराष्ट्र साहित्य परिषदेवर अनेक वर्षे होतो. कार्यकारिणी सदस्य, पत्रिका संपादक, प्रमुख कार्यवाह, कोशाध्यक्ष अशा अनेक जबाबदाऱ्या मी पार पाडल्या. (त्यांच्या या कार्याचा महाराष्ट्र साहित्य परिषदेने यथोचित सन्मानही केला आहे.)

**प्रकाशन क्षेत्रात नव्याने आलेल्यांना एक अनुभवी प्रकाशक म्हणून तुम्ही काय सांगू इच्छिता?**

आता अलीकडची परिस्थिती बदलली आहे. सुशिक्षित व्यक्ती या क्षेत्रात येत आहेत. इंटरनेट, आधुनिक तंत्रज्ञानामुळे सर्व प्रकारची माहिती घरबसल्या उपलब्ध होऊ लागली आहे. साहित्यप्रेमी व्यक्तीला अनेक प्रकारचे ज्ञान मिळवणे खूप सोपे झालेय. घरातलाच व्यवसाय असेल तर नवीन पिढीही यात जम बसवू शकेल.

डी.टी.पी., मांडणी, सौंदर्यशास्त्र यामुळे उत्तम पुस्तक निर्मिती करू शकतील. माझ्या मते एम.ए. (मराठी) असलेली व्यक्ती उत्तम प्रगती करू शकेल. (त्यासाठी मराठीचे ज्ञान आणि शुद्धलेखन आवश्यक).

निपुणगे यांच्याकडे प्रकाशन व्यवसायाविषयी सांगण्यासारखे बरेच काही आहे, पण वेळेची आणि पृष्ठसंख्येची मर्यादा लक्षात घेऊन मी मुलाखत आवरती घेतली.

आज वयाच्या ७९व्या वर्षीही निपुणगे संपादक आणि प्रकाशक म्हणून आपली कामगिरी चोख बजावत आहेत. एक निपुण प्रकाशक म्हणून त्यांच्या कार्याची नोंद निश्चितच घ्यायला हवी.

◆

**प्रभा सोनवणे**
'सोनवणे हाऊस', ३४८, सोमवार पेठ,
पंधरा ऑगस्ट चौक,
पुणे ४११०११



अनुक्रमणिका



निमित्ताने

डॉ. अविनाश सांगोलेकर

# 'मराठी गझलेचा जागतिक संचार'
# एक गाजलेले आंतरराष्ट्रीय चर्चासत्र

■ ■

**सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाची स्थापना इ. स. १९५० मध्ये झाली. तेव्हापासून गेल्या ६७ वर्षांमध्ये मराठी विभागाने अनेक लहान-मोठी चर्चासत्रे आयोजित केली आहेत. मात्र आंतरराष्ट्रीय चर्चासत्र प्रथमच आयोजित करण्यात आले होते. दुसरे असे की, मराठी गझलेवर अशा प्रकारचे आंतरराष्ट्रीय चर्चासत्र आत्तापर्यंत कोठेच आणि कोणीच घेतले नव्हते. ह्याही दृष्टीने ह्या आंतरराष्ट्रीय चर्चासत्रास महत्त्व प्राप्त झाले आहे.**

■ ■

सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या वतीने 'मराठी गझलेचा जागतिक संचार' ह्या विषयावर १२, १३ आणि १४ जानेवारी २०१७ (गुरुवार, शुक्रवार आणि शनिवार) अशा तीन दिवशी आंतरराष्ट्रीय चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. ह्या चर्चासत्राचा समन्वयक आणि मराठी विभागप्रमुख ह्या दोन्ही नात्यांनी जेव्हा मी ह्या चर्चासत्राचा विचार करतो, तेव्हा मला आनंद आणि अभिमान वाटतोच वाटतो. कारण हे चर्चासत्र आयोजित करणे आणि ते यशस्वीपणे पार पाडणे, हे शिवधनुष्य पेलण्याइतके कठीण काम होते. मात्र प्रशासन, सहकारी, विद्यार्थी आणि हितचिंतक ह्या सर्वांच्या मनापासूनच्या सहकार्यामुळे मी हे शिवधनुष्य लीलया पेलू शकलो. हे चर्चासत्र अनेक अंगांनी, अनेक अर्थांनी, अनेक कारणांनी ऐतिहासिक, यशस्वी आणि दर्जेदार झाले, असे मला नम्रपणे म्हणावेसे वाटते. सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाची स्थापना इ. स. १९५० मध्ये झाली. तेव्हापासून गेल्या ६७ वर्षांमध्ये मराठी विभागाने अनेक लहान-मोठी चर्चासत्रे आयोजित केली आहेत. मात्र आंतरराष्ट्रीय चर्चासत्र प्रथमच आयोजित करण्यात आले होते. दुसरे असे की, मराठी गझलेवर अशा प्रकारचे आंतरराष्ट्रीय चर्चासत्र आत्तापर्यंत कोठेच आणि कोणीच घेतले नव्हते. ह्याही दृष्टीने ह्या आंतरराष्ट्रीय चर्चासत्रास महत्त्व प्राप्त झाले आहे. मराठी विभागाच्या इतिहासामध्ये, तसेच मराठी गझलेच्याही इतिहासामध्ये प्रस्तुत चर्चासत्राची साहजिकच उल्लेखनीय बाब म्हणून निश्चित नोंद घेतली जाईल.

काही गोष्टी व्यक्तिगत असल्या, तरी त्या प्रस्तुत विषयाला धरून असल्याने त्या मी येथे नमूद करीत आहे. मराठी गझलसृष्टीतील बहुतेकांना मी मराठी गझलेचा अभ्यासक असल्याचे माहीत आहेच, परंतु मी मूळचा गझलकार आहे, हे मात्र फारच थोड्या लोकांना माहीत असेल. पुण्याच्या गझलमय वातावरणामुळे, तसेच सुरेश भट आणि डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी ह्या दोघांच्या मार्गदर्शनामुळे माझ्यातला गझलकार आणि गझलअभ्यासक घडत गेला, हे येथे मी कृतज्ञतापूर्वक नोंदवतो आहे.

मराठी गझलेच्या वाटचालीला आता २८० हून अधिक वर्षे झालेली आहेत. ह्या वाटचालीतला पहिला टप्पा अमृतराय - मोरोपंत, दुसरा टप्पा माधव जूलियन, तर तिसरा टप्पा सुरेश भट. सुरेश भटांचे निधन झाले, त्याला आता १४ वर्षे होऊन गेली आहेत. त्यामुळे सुरेश भटांनंतरचा चौथा आणि नवा



अनुक्रमणिका







टप्पा आता सध्या सुरू आहे.

तशी इ. स. १९९७ च्या आधीची एक – दोन वर्षं मराठी गझल क्षेत्रात सामसूमच जाणवत होती, काहीशी मरगळही जाणवत होती. मराठी गझल क्षेत्रात चैतन्य निर्माण करणारे सुरेश भट आणि डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी हे वयाने आणि शरीराने थकत चालले होते. आपल्या हातातला गझलेचा झेंडा कुणी तरी ताज्या दमाच्या माणसानं आता हाती घ्यावा, असे त्यांना मनोमन वाटत होते. नेमक्या अशा वेळी भीमराव पांचाळे पुढे आले आणि त्यांनी सुरेश भटांच्या प्रेरणेने आणि मार्गदर्शनाने मराठी गझल चळवळीला व्यापक केले, सामूहिक – संस्थात्मक केले, तिला अ. भा. पातळीवर नेले, तिच्यात नवचैतन्य निर्माण केले. तिसऱ्या चळवळीपासून प्रेरणा घेऊन किंवा ह्या चळवळीशी फटकून राहून महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर अनेक शहरांमध्ये गझलविषयक छोटी – मोठी व्यासपीठे अस्तित्वात आली आणि त्यांच्याद्वारे गझलेला पूरक – पोषक असे अनेक छोटे – मोठे उपक्रम यशस्वीपणे घेण्यात आले, आजही घेण्यात येत आहेत.

'गझल' ह्या काव्यप्रकाराकडे प्रस्थापित समीक्षक, काव्याभ्यासक आणि नवकवी हे पूर्वग्रहदूषित नजरेने पाहात आले होते, तिची ते उपेक्षा करीत आले होते. मात्र एके काळचे नवकवी आणि नवकवितेचे समर्थक डॉ. भालचंद्र नेमाडे ह्यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई विद्यापीठात 'गझल' ह्या काव्यप्रकारावरील इ. स. २००४ मधील परिसंवाद त्यांच्या अध्यक्षीय भाषणाने लक्षणीय ठरला. ''सध्या मुक्तछंदाच्या वापराने मराठी मराठी कवितेला दारिद्र्य आले आहे. म्हणूनच एकाच वेळी विविध विषय समर्थपणे पोहोचवणाऱ्या व वृत्तसौंदर्याने नटलेल्या गझल प्रकाराचा स्वीकार – अंगिकार मराठी भाषेला आवश्यकच ठरणार आहे,'' ही त्यांची स्पष्टोक्ती मराठी काव्यक्षेत्रात खळबळ माजवणारी ठरली. परंतु ह्यातून एक स्पष्ट होते की, प्रस्थापित कवी व समीक्षक ह्यांचा गझलेकडे पाहण्याचा पूर्वीचा तुच्छतेचा, उपेक्षेचा दृष्टिकोन आता बदलत चाललेला आहे. (पाहा : मुक्तछंदाने दारिद्र्य? नेमाडे सरांचा फॉर्म्युला, ह्या शीर्षकाची बातमी, दै. महाराष्ट्र टाईम्स, मुंबई, ७ एप्रिल २००७, बुधवार, पृ. ७).

इ. स. २००६ नंतरच्या अलीकडच्या दशकामधले नवनवीन गझलकार आणि त्यांची गझल हे सर्व जाणून घ्यावयाचे असेल, तर त्यासाठी इ. स. २०१० नंतर प्रकाशित झालेले तीन प्रातिनिधिक गझलसंग्रह उपयुक्त ठरू शकतात. त्यांचा तपशील असा: १. 'ग+ज+ल : सुरेश भटांनंतर', संपादक : डॉ. राम पंडित, अभिव्यक्ती प्रकाशन, नवी मुंबई, प्रथमावृत्ती : १७ डिसें. २०११, २. 'मराठी ग+ज+ल : सुरेश भटांनंतर', संपादक : भीमराव पांचाळे, डी. एन. गांगण, ग+ज+ल सागर प्रतिष्ठान, मुंबई, प्रथमावृत्ती : ९ मे ब्रु. २०१३, ३. 'मराठी ग+ज+ल : अर्धशतकाचा प्रवास', साहित्य अकादेमी, नवी दिल्ली, प्रथमावृत्ती : इ. स. २०१४. अलीकडच्या दशकामध्ये मराठी गझलकारांमध्ये खूपच विपुलता आणि विविधता जाणवू लागलेली आहे. ई–मेल, मेसबुक, व्हॉटस् ॲप अशा प्रकारच्या सोशल मिडियांमुळे गझलकार आणि पर्यायानं त्यांची गझल ह्या दोन्ही गोष्टी घरबसल्या सहज आणि चटकन उपलब्ध होऊ लागल्या आहेत.

एकूणच मराठी गझल चळवळ पुढे नेण्यासाठी भीमराव पांचाळे ह्यांचे योगदान तर मोठे आहेच; शिवाय प्रदीप निफाडकर, डॉ. राम पंडित, डॉ. शेख इक्बाल 'मित्रेम, अप्पा ठाकूर, उदयदादा लाड, सुरेशकुमार वैराळकर, जनार्दन केशव म्हात्रे, आप्पा ठाकूर, प्रशांत वैद्य ह्यांचेही योगदान महत्त्वाचे आहे. शिवाय त्या त्या भागातले कितीतरी गझलकार आणि गझलप्रेमी छोटेमोठे गझलविषयक उपक्रम घेऊन गझल चळवळीला आणखी पुढं नेण्याचा प्रयत्न करताना आढळतात.

सुरेश भटांच्या नंतर डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी ह्यांचा मराठी गझलसृष्टीमध्ये एक दबदबा होता. त्यांचे निधन २२ जुलै २०११ रोजी झाल्यानंतर हा दबदबा नाहीसा झाला. अलीकडच्या काळामध्ये गझलेच्या क्षेत्रामध्ये छोटेमोठे गट निर्माण होऊन गटबाजी फोफावत चाललेली दिसते आहे. गटबाजी करणाऱ्यांना 'ग' गझलेचा आहे, तो कृपा करून गर्वाचा करू नका, हे सांगण्याची वेळ आता आली आहे. गट–तट हेव्यादाव्यांसाठी असू नयेत, तर ते मराठी गझलेला अधिक पुढे नेण्यासाठी असावेत.

आता मराठी गझलेशी संबंधित अशा सर्वांची म्हणजे गझलकारांची, गझलअभ्यासकांची, गझल चळवळीतल्या कार्यकर्त्यांची, गझलगायकांची अशा सर्वच गझलप्रेमींची जबाबदारी पूर्वीपेक्षा कितीतरी पटीने अधिक वाढली आहे. मराठी गझलेविषयी समाजाच्या अपेक्षा वाढलेल्या, उंचावलेल्या असताना त्या अपेक्षांना गझलेशी संबंधित सर्वांनी न्याय दिला पाहिजे, त्या अपेक्षा पुऱ्या केल्या पाहिजेत. असे जर झाले नाही, तर काळ त्यांना क्षमा करणार नाही, ह्याची खूणगाठ प्रत्येक मराठी गझलप्रेमीने



अनुक्रमणिका

स्वत:शी मारली पाहिजे. ह्यात एक गझलप्रेमी म्हणून आणि मराठी विभागाचे उत्तरदायित्व म्हणून मी 'मराठी गझलेचा जागतिक संचार' ह्या आंतरराष्ट्रीय चर्चासत्राचे आयोजन केले होते. त्यासाठी मी आणि माझा विभाग असे आम्ही साधारण एक वर्षापासून पूर्वतयारी करीत होतो. ह्या कामी माझा गझलकारमित्र प्रदीप निफाडकर ह्याची खूप मोलाची मदत झाली. ह्या चर्चासत्राचे महत्त्व लक्षात घेऊन विद्यापीठाच्या प्रशासनाने आणि प्रसिद्धीमाध्यमांनी खूपच प्रोत्साहन दिले. चर्चासत्राला भारतभरातील प्रतिनिधींनी आगाऊ नोंदणी करून आपला चर्चासत्रातील सहभाग आधीच निश्‍चित केला होता. विद्यापीठाच्या खेर वाङ्मय भवनमधील संत नामदेव सभागृह हे आधीच नावनोंदणी केलेल्या प्रतिनिधींनी भरून जाणार, हे लक्षात आल्याने चर्चासत्राच्या आधी दोन दिवस नावनोंदणी बंद करावी लागली. चर्चासत्रासाठी भारतातील आणि भारताबाहेरील ३५ ते ४० व्यक्तींना साधनव्यक्ती (रिसोर्स पर्सन) म्हणून निमंत्रित करण्यात आले होते. दुबईवरून शैलेंद्र साठे व शिवानी सिरोडकर, अमेरिकेहून सौ. सोनाली जोशी, मॉरिशसहून डॉ. बीदन अब्बा हे परदेशी अभ्यासक ; तसेच सौ. शोभा तेलंग (इंदूर), विवेक सावरीकर उर्फ विवेक मृदुल (भोपाळ), दर्शन शाह उर्फ स्नेहदर्शन (हैदराबाद) हे परप्रांतीय अभ्यासक आवर्जून आले होते. चंद्रपूर, अमरावती, बुलढाणा, नागपूर, औरंगाबाद, भुसावळ अशा महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातूनही अभ्यासक वेळ काढून आले होते. साधनव्यक्तींच्या बाबतीत हे जसे घडले, तसेच सहभागी प्रतिनिधींच्या बाबतीतही असेच घडले. चर्चासत्राचे उद्घाटन ९० व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. अक्षयकुमार काळे ह्यांच्या हस्ते, अ.भा. मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी ह्यांच्या प्रमुख उपस्थितीत आणि सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे कुलसचिव डॉ. नरेंद्र कडू ह्यांच्या अध्यक्षतेखाली १२ जाने. २०१७, गुरुवार रोजी सकाळी करण्यात आले. ह्या प्रसंगी डॉ. अविनाश सांगोलेकरांच्या (म्हणजे माझ्या) 'मराठी गझल : प्रवाह आणि प्रवृत्ती' ह्या समीक्षालेखसंग्रहाचे प्रकाशन मान्यवरांच्या हस्ते करण्यात आले. ह्या उद्घाटन समारंभाचा एक भाग म्हणून ह्या प्रसंगी गझलनृत्य सादर करण्यात आले. मनाली तुंगे ह्या विद्यार्थिनीने प्रदीप निफाडकरांची 'देखणी' ही गझल ह्या प्रसंगी गायिली, तर सौ. रेश्मा मुसळे-परितेकर ह्या विद्यार्थिनीने त्यावर गझलनृत्य सादर केले. वस्तुतः अरबी-फार्सी-उर्दू-हिंदी गझलपरंपरेमध्ये गझलनृत्य प्रचलित आहे. मराठी गझलपरंपरेमध्ये मात्र ह्या सादरीकरणाच्या निमित्ताने गझलनृत्याचा हा पहिलाच प्रयोग संपन्न झाला आणि त्याची चर्चा सर्वदूर चांगल्या पद्धतीने झाली. ह्या चर्चासत्रामध्ये गझलकार, गझलगायक, गझलअभ्यासक, गझल चळवळीतील कार्यकर्तेअशा विविध घटकांचे म्हणणे लोकांसमोर येऊ शकले. चर्चासत्रात नुसती अ‍ॅकॅडेमिक चर्चाच झाली, असे नाही; तर प्रदीप निफाडकरांच्या अध्यक्षतेखाली गझलवाचनाचा कार्यक्रम झाला, तसेच सुधाकर कदमांच्या अध्यक्षतेखाली गझलगायनाचा कार्यक्रमही झाला. त्यामुळे चर्चासत्रात कंटाळवाणेपणा, रुक्षता, नीरसता ह्या गोष्टी अजिबात येऊ शकल्या नाहीत. इलाही जमादार, सौ. संगीता जोशी, प्रदीप निफाडकर, ए. के. शेख, सौ. शोभा तेलंग, डॉ. शेख इक्बाल 'मित्रे', घनश्याम धेंडे, डॉ. अजीज़ नदाम , शिवाजी जवरे हे ज्येष्ठ गझलकार ; सुधाकर कदम, डॉ. शशिकला शिरगोपीकर हे ज्येष्ठ गझलगायक, तसेच शाहीर सुरेशकुमार वैराळकर, प्रा. विश्‍वास वसेकर हे ज्येष्ठ गझलप्रेमी ह्यांची उपस्थिती आणि त्यांचे उपस्थितांना झालेले मार्गदर्शन ही ह्या चर्चासत्राची जमेची बाजू म्हणावी लागेल. डॉ. संतोष कुलकर्णी, जनार्दन म्हात्रे, दत्तप्रसाद रानडे, रवी धारणे, गंगाधर मुटे, प्राजक्ता पटवर्धन ह्या तरुण पिढीतील साधनव्यक्तींनी हे चर्चासत्र अधिक लक्षवेधक केले. चर्चासत्राचा समारोप डॉ. नागनाथ कोत्तापल्ले ह्यांच्या अभ्यासपूर्ण भाषणाने १४ जानेवारी २०१७, शनिवार रोजी पूर्णत्वास गेला. चर्चासत्राची लहान-मोठी सर्व जबाबदारी मराठी विभागातील विद्यार्थी-स्वयंसेवकांनी मोठ्या आत्मविश्‍वासाने, स्वयंशिस्तीने आणि आस्थेने पार पाडली. त्याचेही सर्वत्र चांगले कौतुक झाले.

◆

**डॉ. अविनाश सांगोलेकर,**
प्राध्यापक व प्रमुख, मराठी विभाग,
सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ,
पुणे -४११००७
चलभाष : ९८५०६१३६०२
avinashsangolekar@unipune.ac.in



अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

रेखा भंडारे

# 'गेले लिहायचे राहून' विनायकदादांच्या अनुभवांचे वैशिष्ट्यपूर्ण भांडार

'गेले लिहायचे राहून' हा 'नाशिक'चे अनभिषिक्त सांस्कृतिक मंत्री म्हणून ओळखल्या जाणाऱ्या विनायकदादा पाटील यांचा २५२ पानांचा ग्रंथराज नुकताच 'राजहंस प्रकाशना'ने प्रकाशित केला. यातले काही लेख 'महाराष्ट्र टाइम्स'च्या कॉलममधून वाचायला मिळाले असले, तरीही बाहेर जायच्या कपड्यांनिशी तयार होऊन, सजून-धजून, ठेवणीतले खास अत्तर लावून ग्रंथरूपाने एकत्रितपणे नव्याने वाचताना वाचकाला हरखून टाकण्याचे सामर्थ्य या ग्रंथाच्या पानापानांत दडलेले आहे. साहित्य, कला, राजकारण, शेती इत्यादी विविध विषयांत मातब्बरी लाभलेल्या दादांच्या व्यक्तिमत्त्वाच्या व्यापक परिघाचे अनेक रंग नव्याने या पुस्तकातून उलगडत जातात आणि दादांचे 'दादापण' वाचकाच्या आकलनकक्षेचा ताबा घेत जाते. खरे तर दादा नव्याने उमगत- कळत जातात.

पुस्तकातील लेखांची चार स्वतंत्र भागांत विभागणी केलेली आहे. 'स्मरणांकित'मध्ये २८ लेखांचा समावेश असून आठवणीच्या तरल जगातली ही सफर अनोखी आहे. 'राग दरबारी' असे काव्यात्म नाव धारण करून येणाऱ्या चोवीस लेखांमध्ये राजकारणातले दादांचे वावरणे- ज्याविषयी सर्वसामान्यांच्या मनात प्रचंड उत्सुकता असते- त्यातल्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वांच्या प्रसन्न आठवणींचे शैलीदार लेखन वाचावयास मिळते. 'केली पण शेती'मध्ये वनाधिपतींच्या 'शेती' या विषयासंदर्भातल्या नवनवीन प्रयोगांची, अनुभवांची सुरस वाचनीय मांडणी ३५ लेखांमधून आपल्यासमोर येते. 'साहित्य पौर्णिमा' या शीर्षकाखाली असलेल्या पंधरा लेखांमधून निरनिराळ्या साहित्यिकांशी असलेल्या मैत्रीचा अनुबंध उलगडत जातो. सर्व मिळून एकूण एकशे दोन लेखांचा समावेश असलेला हा ग्रंथराज म्हणजे साधारण १९५४पासून ते २०१५ पर्यंतचा कालखंड व्यापणारा आणि 'बालके विनायक'पासून ते सांप्रत विनायकदादांपर्यंतचा विलक्षण रंगतदार प्रवास शब्दाशब्दांतून उलगडत दाखविणारा आहे. 'वाचनीयता' हे मूल्य या पुस्तकाला लाभले आहे. एका अर्थाने हे ललित लेखन म्हणजे एक बोलके, आत्मकथनच- पण विविधरंगांनी नटून फुललेलं, बहुपाकळ्यांनी बहरलेलं बहुरंगी सरोवरमग्न कमळच!

छोटेखानी-पाना-दीड पानाच्या लेखातून नेमक्या शब्दांत जे भावविश्व-मनोविश्व दादा आपल्यासमोर उभे करतात ते मोठे विलक्षण आहे. कुठेही पाल्हाळ नाही. त्यामुळे कंटाळवाणेपणा नाही. लेखांची शीर्षकेही कमीत कमी अक्षरांत लेखाचे मर्म उलगडणारी, मापाजोगती. ढगळपणा नाहीच. विषयवैविध्य तर अफलातून, म्हणजे गोधडीपासून ते अभिनयसम्राट दिलीपकुमारांच्या मैत्रीपर्यंतचे. किस्से, प्रसंग, व्यक्ती, घटना सगळ्यांचे तपशील शाबूत ठेवणारी दांडगी स्मरणशक्ती. खुसखुशीत नर्मविनोदी चतुर शैली, काही काही लेखांमधून तर हसून हसून दमछाक करणारी शैली, अनुभवातला उत्कटपणा, वर्ण्यविषयाशी तादात्म्य पावून किस्से रंगवणारी, प्रभुत्व असलेली शब्दकळा आणि वृत्तीतला विनोद हे पुस्तकाचं मर्मस्थान. विविध क्षेत्रांतल्या मान्यवरांशी जुळलेली त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची नाळ हेही विलक्षण रसायन. निर्माण झालेले मैत्रीचे घट्ट बंध आणि त्यातून फुलणारे दादांचे व्यक्तिमत्त्व. पाय जमिनीवर घट्ट रोवलेले. मैत्रीचे बंध जपताना जात, पक्ष, पंथ, भाषा असले अडसर कधीच येत नाहीत. असे हे सर्वस्वीकारक्षमता लाभलेले उत्तुंग व्यक्तिमत्त्व! भारतीय मतदारांच्या सामूहिक शहाणपणाचे अस्तित्व मान्य करणारे व्यक्तिमत्त्व. साहित्याचे अनेक आकृतिबंध दादा सहजगत्या हाताळताना दिसतात. 'विठु माझा'मध्ये त्यांच्यातला आस्वादक समीक्षक दिसतो. 'रंगनाथ' हे उत्कट शब्दचित्र व 'माझा विरंगुळा' हे सुभाष अवचटांचे अप्रतिम शब्दचित्र, नाशिकच्या डॉ. श्री. रा. क्षीरसागरांवरचा लेख, 'महातो कहीन' मधला कँटिन बॉय



अनुक्रमणिका

■

**सर्व मिळून एकूण एकशे दोन लेखांचा समावेश असलेला 'गेले लिहायचे राहून' हा ग्रंथराज म्हणजे साधारण १९५४पासून ते २०१५ पर्यंतचा कालखंड व्यापणारा आणि 'बालके विनायक'पासून ते सांप्रत विनायकदादांपर्यंतचा विलक्षण रंगतदार प्रवास शब्दाशब्दांतून उलगडत दाखविणारा आहे. 'वाचनीयता' हे मूल्य या पुस्तकाला लाभले आहे. एका अर्थाने हे ललित लेखन म्हणजे एक बोलके, आत्मकथनच- पण विविधरंगांनी नटून फुललेलं, बहुपाकळ्यांनी बहरलेलं बहुरंगी सरोवरमग्न कमळच!**

■



महातो, भिलारे गुरुजी, जनता पक्षाचे अध्यक्ष चंद्रशेखर, मनस्विनी माधुरी पुरंदरे इत्यादी सगळी व्यक्तिचित्रे हुबेहूब जमली आहेत. अल्पाक्षरी क़थाही येथे वाचायला मिळते. 'साहेबांचे अक्षर', 'उर्दू' या तर सत्यकथाच आहेत. तेव्हा अनेकरंगी असे हे लिखाण आहे. प्रस्तावनेतील 'अंगाई गाताना बाळाऐवजी आईच झोपी जावी तसे' हे मला आवडलेले विधान आहे.

या पुस्तकाचे मुखपृष्ठही वेगळे- लक्ष वेधून घेणारे- 'आंतरराष्ट्रीय प्रकरणाने' तयार केलेले- दादांचा आवडता 'विरंगुळा' असलेले, प्रख्यात चित्रकार सुभाष अवचटांनी तयार केलेले! चार-पाच झाडांचे खोड- बुंधा- त्यातला लक्ष वेधून घेणारा खालचा विटकरी रंग- खोडालगत असलेल्या सावलीचा निवांतपणा- त्यातल्या मधल्या एका कवडशासारख्या जागेतून पलीकडचे हिरवेगार पोपटी पिवळे विश्व टिपणारे दोन ठिपके... सर्जनाचे अस्तित्व (टिपणारे) कवेत घेणारे... मलपृष्ठावर विनायकदादांची करारी मुद्रा. त्यावरचा उन्हाचा लक्षवेधी कवडसा. असे निसर्गसान्निध्यात- वृक्षराजीत रमलेले दादांचे व्यक्तिमत्त्व आणि त्यांना भावलेले नवनिर्मितीचे सृजन स्वप्न अधोरेखित करणारे मुखपृष्ठ सुभाष अवचटांच्या स्टुडिओतून साकारलंय, म्हणूनच ते आम नाही, खास आहे. ह्या बहरलेल्या वृक्षाचा हा पसरलेला बुंधा आपल्या निर्मितीची कथाच जणू सांगतोय, असा भास व्हावा इतके बोलके हे मुखपृष्ठ!

दादांनी पुस्तक अर्पण केलंय ते शिवशाहीर श्रीमंत बळवंत मोरेश्वर तथा बाबासाहेब पुरंदरे यांना. किंबहुना हा त्यांचाच 'कृपाप्रसाद' आहे असे विनम्रतेने दादा सांगतात. या घटनेतला वरवर वाटणारा अचंब्याचा भाग सोडला तर दादांचे व्यक्तिमत्त्व बहुपेडी अनेक रंगांत रंगून गेल्याचे पाहायला मिळते. अनेकांच्या निखळ मैत्रीचे हक्कदार होण्याचे भाग्य दादांना लाभले आहे. शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, माजगावकर कुटुंबीय, कुसुमाग्रज, व्यंकटेश माडगूळकर, मंगेश पाडगावकर, यशवंतराव चव्हाण, शरद पवार, पं. जसराज, कविवर्य ना. धों. महानोर, किती तरी नावे. या सगळ्यांशी त्यांचे मैत्र जुळलेले. तेही घट्ट. जन्मांतरीचे. विविध माणसे, विविध क्षेत्रे, विविध कर्तृत्वे, श्रद्धेय कुसुमाग्रजांचा आशीर्वाद आणि सल्ला आपल्याला आधारभूत झाल्याचे ते मान्य करतात 'सर्वज्ञ- सिद्ध पुरुषोत्तम' म्हणून त्यांचे अप्रतिम वर्णन करणारे चार लेख या पुस्तकात आहेत. न ठरवता घेतलेली एक सुंदर मुलाखत- त्यातून उलगडणारे तात्यासाहेब आणि प्रश्नकर्त्याचा चौकसपणा वाखाणावा तेवढा थोडाच. 'जन्म कवितेचा' हे नव्याने होणारे आकलन- 'काजू'मधली फसवी, जीवघेणी गंमत आणि १९५७ मधली तात्यासाहेबांची झालेली पहिली भेट हे सर्व मुळातून वाचण्यासारखेच आहे.

'स्मरणांकित'मध्ये दादांच्या पहिल्या प्रेमाची हक्कदार झालेली गोधडी, मायेपोटी मिळालेले तिकीट, 'धडा' या खळखळून हसायला लावणाऱ्या लेखामधून 'घरी या ना त्या कारणाने नेहमी मार खावा लागत असे' हा सहजगत्या दिलेला कबुलीजबाब- हा धडा व्यक्तिमत्त्वातल्या प्रामाणिकतेची साक्ष देणारा आहे. नाशिकची वकीलवाडी, त्यातला 'स्फूर्ती' बंगला, विद्यार्थिदशा, भाषेवरचे प्रभुत्व, दांडगी स्मरणशक्ती अशी चित्रात्मकता लाभलेली शब्दकळा. 'अरे गाढवांनो' असे म्हणणाऱ्या बाईंनी 'अरे घोड्यांनो' म्हटल्यावर 'प्रमोशन' मिळाल्यासारखे वाटणे- ही वृत्तीच नर्म-मार्मिक विनोदाचा मूलस्रोत असावी असे वाटते.

'नवनीत' नावाच्या हिंदी मासिकातला उत्तरपत्रिका व विद्यार्थी यांच्या संदर्भातील एक किस्सा वाचून तो लक्षात ठेवून थेट गोळवलकर गुरुजींना हा किस्सा ऐकवण्याची संधी मिळालेले दादा. एका विद्यार्थ्याने काहीही अभ्यास केला नव्हता. त्याने पेपरमध्ये लिहिले, 'हजारोंकी किस्मत



अनुक्रमणिका






तेरे हाथ है, अगर पास कर दे, तो क्या बात है।' तपासणाऱ्याने मार्कांच्या जागी पुढील ओळ लिहिली– 'कितोबोंकी किल्ली तेरे हाथ थी। याद करके लिखता तो क्या बात थी!' असे किस्से आणि असे प्रसंग. ह्या अनुभवाचा पोतच वेगळा–वैविध्यपूर्ण. शैलीदार लेखनाचे नमुने तर पानापानांवर विखुरलेले. उदा. 'जिवावर आले, पण स्पेलिंगवर निभावले.' गंभीर प्रसंगातही त्यांची तटस्थता विलक्षण. म्हणजे मेथीच्या लाडूचा डबा पोहोचेपर्यंतचा कालखंड म्हणजे 'तिष्ठत बसलेल्या यमराजाला पाहिल्याचा अनुभव देणारा', हे गांभीर्यही शब्दांनी अचूक पेललंय. अनुभवाच्या पाल्हाळविरहित मुद्देसूद मांडणीमुळे वाचनीयता वाढते. 'आमदाराघरी कावळा पाहुणा', 'साखरेचाही घाव असतो हे नव्याने कळायला लावणारा,' 'सुतावरून स्वर्ग गाठता येतो याचा अनुभव घेतला', 'गावात ब्राह्मण असल्याने गावाला गावपण येते, हा माझ्या आईचा अनुभव, तर देवळात ब्राह्मण असला की देवाला देवपण येते' हा माझा अनुभव किंवा 'प्रयोगशाळेतील क२ज धरणात साठवले की पाणी होते. तेच पाणी (चितळे प्रमुख) शेतीला मिळाले की त्याचे तीर्थ होते आणि चितळे होतात तीर्थस्वरूप!' असे शैलीदार लेखनाचे किती तरी उत्कट नमुने या लेखनात अनुभवता येतात.

शब्दकळेवरचे प्रभुत्व तर चकित करणारे–मातीशी नाते सांगणारे. म्हणजे चाभ्रटपणा, लुगडे, खापर, टापशी, क्षारपड जमीन, चिभट जमीन, उंडारणे, उचापती इत्यादी अनेक शब्दांचा वापर सध्याच्या वातावरणात 'मराठी'चे सामर्थ्य जाणणारा ठरतो.

'स्मरणांकित'मध्ये तिकीट, धडा, सन्नाटा, जामीन, पंपासरोवर, सुन्न, भूक, रंगनाथ, सहचारिणी इत्यादी लेख लक्षवेधी आहेत. 'सन्नाटा' तर जबरदस्त. परंतु 'अन्नपूर्णेचे चित्र मिळाले की नाही', 'मायसनचे पुढे काय झाले' असे विविध प्रश्न उत्सुकतेपोटी निर्माण होतात. 'भूक' या विषयावरचे विविध लेख सूक्ष्म निरीक्षण व मार्मिक टीकाटिप्पणीतून प्रखर वास्तवाचे विविध पदर टिपले आहेत. 'सहधर्मचारिणी' हा एक उत्कट अप्रतिम लेख उत्सुकतेचे शमन करणारा आहे.

निफाड तालुक्यातल्या कुंदेवाडी गावच्या सरपंचपदापासून सुरू झालेली दादांची राजकीय कारकीर्द ते थेट महाराष्ट्राच्या मंत्रीमंडळापर्यंत झालेला त्यांचा प्रवास. या प्रवासात अनेक महत्त्वपूर्ण पुरस्कारांनी सन्मानित झालेले दादा राजकारणातला सक्रिय सहभाग 'राग दरबारी'च्या चोवीस लेखांतून याविषयी व्यक्त होतात. एकूणच, या क्षेत्रातला त्यांचा दबदबा– अनोखे कर्तृत्व लक्षणीय. बोलण्यातले लाघव हे तर मोहिनीअस्त्र. या विभागतले अनेक लेख 'चहा मुख्यमंत्र्यांचा, साहेबांचं अक्षर, उर्दू, आहार आणि मन, मीडिया आणि मतदार, रामशास्त्री, इंद्रधनुष्य, रसिकराज, दयाळूमास्तर, साहेब, महाराणी बाग– कोठी नंबर २ इत्यादी अनेक लेख वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

महाराष्ट्राच्या म्हणण्यापेक्षा भारतीय राजकारणाच्या क्षेत्रातल्या अनेक महत्त्वपूर्ण व्यक्तींचे उल्लेख या लेखनात सहजगत्या येतात व दादांचे या क्षेत्रातले 'प्रस्थ' उलगडत जाते. विषय राजकारणाचा असला तरी वृत्तीने 'साहित्यिक' असल्यामुळे हा रंगही लोभसपणे खुलविला आहे. त्यात कुठेही 'मी'पणा नाही किंवा लपवाछपवीही नाही. लेखनात सहजता आहे. म्हणूनच त्या ओघात 'शरद पवारांना हजारो मित्र आहेत. प्रत्येकाला ते फक्त आपलेच आहेत असे वाटत असते, प्रत्येक गौळणीला कृष्ण आपला वाटतो तसे' असे ते सहजगत्या सांगून जातात. वास्तविक शरद पवारांचे आणि दादांचे मैत्र जगजाहीर– म्हणून अधिकारही मोठा. म्हणूनच त्यांच्यासंबंधीच्या अनेक लेखांतून या मैत्रीचे किती तरी नवे रंग उत्कटपणे उलगडत जातात. म्हणूनच हे सारे खुसखुशीत लेखन ताजे टवटवीत वाटते, वाचावेसे वाटते. त्यांच्या मनातला गुरु आदराचा हळवा कोपराही 'यशवंतराव चव्हाणांची भेट किंवा नुसते दिसणे हीसुद्धा सुखद व महत्त्वाची बाब होती' अशा वाक्यातून आपले अस्तित्व दर्शवितो. तसे किसन वीरांच्या कोटातून अत्तराची कुपी काढून घेण्याचा वृत्तीतला खोडसाळपणाही हसायला लावतो. किंवा, स्वतःविषयी 'मी सत्तेच्या प्रेरणा असलेला स्वातंत्र्योत्तर काळातील कार्यकर्ता' असे लेखन वास्तवाच्या प्रखर जाणिवेतूनच येते.

'केली पण शेती'मधल्या पस्तीस लेखांमधून त्यांच्यातल्या जातिवंत शेतकऱ्याचे विलोभनीय दर्शन होते. अनेक लेखांमधून विविध माणसे व त्यांना टिपणारे दादा पाहायला मिळतात. 'शेवगा ही मराळे यांनी अनुभवलेली ओवी आहे,' किंवा 'चंद्रकांत बारहाते म्हणजे आवळ्याचे विद्यापीठच आहेत', 'दुर्लक्षित वेडी बाभूळ सन्मानाने बोलावले व थोडे लक्ष दिले तर शहाण्यासारखी वागते.' 'वासुदेव चिमणराव कोठ हा द्राक्ष माउलीचा खरा वारस आहे,' 'आनंद गगनात मावेना, एक पंथ दो काज, शेतकऱ्याला उत्पन्न व जमीनही दुरुस्त, औषधानेच रोग्याला



अनुक्रमणिका

पैसे देण्यासारखे' अशी अनेक शैलीदार वाक्ये मार्मिकपणे येतात आणि शेतीमधला हा अनोखा 'वनाधिपती' प्रकर्षाने उलगडत जातो. नाचणीऐवजी काजूची लागवड किंवा कावळ्यांचीही आठवण येणारा सहृदय माणूस- शेतीतले अनेक नवे प्रयोग, निलगिरीची शेती, अशा अनेक नव्या गोष्टींचे आकलन होत जाते. म्हणूनच 'शेती' विषय असला तरी त्याच्या मांडणीतले, विचारातले नावीन्य आकर्षक वाटते. त्यांची भूमिका 'तसा मी वृक्षजगतातील एका विटेवरचा पुंडलिक. निलगिरीच्या विटेवरचा' ही आहे. 'साखरफुटाणी' यात त्यांच्या हळव्या कविमनाचे दर्शन घडते.

'साहित्यपौर्णिमे'तल्या पंधरा लेखांमधून पौर्णिमेच्या लख्ख प्रकाशात अथांग विहार केल्यासारखे वाटते. सुभाष अवचटांवरचा त्यांचा लोभ 'माझा विरंगुळा'च्या शब्दाशब्दांतून प्रकटला आहे. 'पोहोचायचे कुठेच नसते, आणि कुठेच पोहोचायचे नसते हे माहीतही नसते,' असा सुभाष अवचट- एक अवलिया, निसर्ग चित्रकार. तरीही 'खैरात मागणारे अन्नाच्या प्रतीक्षेत, सुभाष अवचट प्रतिभेच्या प्रतीक्षेत, विनायक पाटील सत्तेच्या प्रतीक्षेत. काही रांगा दृश्य, तर काही रांगा अदृश्य, सुटका नाही.' असे वर्णनातले वास्तव आकर्षित करते. ह्या शैलीच्या वेगळेपणामुळेच मनस्विनी, वगैरे सर्व लेख अत्यंत वाचनीय झाले आहेत. 'तान धक्का समेकृत्वा। लाभालाभौ जयाजयौ।।' गझल, संस्कृत इत्यादींवरचे प्रभुत्व वाखाणण्यासारखे. चाफा, औट घटकेचा संपादक- शिकवणी इत्यादी अनेक लेख वैशिष्ट्यपूर्ण झाले आहेत.

'गेले लिहायचे राहून' ही खंत दादांची लेखनप्रेरणा ठरली आहे. म्हणूनच त्यांच्याकडे अनुभवांचे भांडार आहे. त्यातून आणखी 'शब्दरत्ने' दादांनी दाखवावी अशी अपेक्षा वाढत जाते. या एका ग्रंथाने 'साहित्यविश्वावर' दादांची मुद्रा कोरली आहेच. तशा अपेक्षाही वाढल्या आहेत.

◆

**रेखा भंडारे**

---

## मनःपूर्वक अभिनंदन!


श्री. आसाराम लोमटे


श्री. मिलिंद चंपानेरकर

श्री. आसाराम लोमटे यांच्या 'आलोक' या कथासंग्रहाला आणि श्री. मिलिंद चंपानेरकर यांना सईद अख्तर मिर्झा यांच्या 'Ammi : Letter to a democratic mother' या पुस्तकाच्या 'लोकशाहीवादी अम्मीस दीर्घपत्र' या अनुवादित पुस्तकासाठी 'साहित्य अकादमी' पुरस्कार मिळाला.

'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' आणि 'महाराष्ट्र साहित्य परिषद'तर्फे हार्दिक अभिनंदन आणि भावी लेखनासाठी मनःपूर्वक शुभेच्छा!

**– संपादक**



अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

रूपाली शिंदे

# 'स्त्री परिषदांचा इतिहास'



स्त्री-परिषदांचा इतिहास : इ.स.१८५०-२०००, महाराष्ट्राच्या मर्यादेत
डॉ. स्वाती कर्वे
अभिजित प्रकाशन, पुणे

डॉ. स्वाती कर्वे यांचे 'स्त्री-परिषदांचा इतिहास' (इ.स. १८५० ते २०००) : महाराष्ट्राच्या मर्यादेत' हे संकलन आणि संशोधनपर पुस्तक प्रसिद्ध झाले. मराठी साहित्याच्या अभ्यासक आणि संशोधक म्हणून स्वाती कर्वे यांचा परिचय मराठी साहित्याच्या वाचकांना, अभ्यासकांना आहेच. 'लघुकादंबरीची संकल्पना व मराठी 'लघुकादंबरी' या विषयावरील प्रबंधलेखनासह त्यांचे स्वतंत्र ग्रंथलेखन प्रसिद्ध झालेले आहे. 'जयवंत दळवींची नाटके : एक अंतर्वेध', 'भारतीय सण आणि उत्सव' हे त्यांचे आजवर प्रसिद्ध झालेले ग्रंथ. याखेरीज डॉ. कर्वे यांनी 'स्त्रियांची शतपत्रे' या महत्त्वाच्या सामाजिक-सांस्कृतिक विषयावर संशोधन केलेले आहे. 'स्त्री-परिषदांचा इतिहास' (इ.स. १८५०-२०००) हा त्यांचा संशोधन आणि संकलनपर ग्रंथ महाराष्ट्रातील स्त्री-जीवनावरील स्थित्यंतरे दर्शवितो, म्हणून तो महत्त्वाचा आहेच. त्याचबरोबर मराठी साहित्याच्या अभ्यासक, संशोधक अशी ओळख असलेल्या कर्वे यांची अभ्यासविषयातील रुची, संशोधनातील नवी वाट आणि विकास दर्शविणारा ग्रंथ म्हणूनही महत्त्वाचा आहे. साहित्याच्या या अभ्यासक स्वतःचे स्त्री असणे एका व्यापक समाज-सांस्कृतिक जीवनाच्या संदर्भात शोधू पाहत आहेत, हे या ग्रंथाच्या निमित्ताने अधोरेखित होते. अभ्यासक-संशोधकाने निवडलेले, अभ्यासलेले संशोधन विषय त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा कल आणि त्याची अभ्यासातील गती दर्शवितात. डॉ. कर्वे यांचा स्त्रियांच्या नियतकालिकांचे लेखन-संपादन (१८५०-२०००) या विषयावरील प्रदीर्घ, संशोधनपर लेख, त्यानंतर पुढे 'स्त्रियांची शतपत्रे' यावरील लेखन त्यांचे संशोधनाचे आस्था विषय दर्शविण्यासाठी पुरेसे बोलके आहेत.

'स्त्री-परिषदांचा इतिहास' हा ग्रंथ सामाजिक-ऐतिहासिक-सांस्कृतिक घटनांची संग्रहरूपाने एकत्रित नोंद घेणारा ग्रंथ म्हणून महत्त्वाचा आहे. दोन हजारच्या दशकाचा, वर्तमान संदर्भ घेऊन पुन्हा एकदा इ. स. १८५० ते २००० या कालखंडाचे पुनरावलोक केल्यास स्पष्ट होणारे स्त्रीविकास चित्रण म्हणून तो महत्त्वाचा आहे. स्त्री-परिषद, स्त्री-परिषदांच्या इतिहासाचे दस्तऐवजीकरण (Documentation)



अनुक्रमणिका

करण्याचे महत्त्वाचे काम या ग्रंथामुळे पूर्णत्वास गेले आहे.

आज हा स्त्री-परिषदांचा इतिहास जाणून घेणे गरजेचे का आहे, असा प्रश्न एक वाचक म्हणून उभा राहतो. या प्रश्नाचे उत्तर प्रस्तुत ग्रंथाच्या उपसंहारामध्ये आलेले आहे. स्त्रीसुधारणेसाठी, स्त्रीशिक्षणासाठी महाराष्ट्रात घडून आलेले नवे मन्वंतर, त्यानंतर स्त्रियांकडे पाहण्याचा हळूहळू बदलत गेलेला समाजाचा दृष्टिकोन, घराबाहेरच्या सार्वजनिक जीवनात स्त्रियांचा प्रवेश होणे आणि मग स्त्री स्वतःच जागरूक होणे, हे महाराष्ट्रातील समाजजीवनातील महत्त्वपूर्ण बदल आहेत. हे बदल घडत असताना समाजजीवनातील मतमतांतराची जाणीव प्रस्तुत पुस्तकामुळे होते. याशिवाय स्त्रीला माणूस असल्याची जाणीव होणे, कुटुंबातील नात्यांच्या चौकटीतील स्त्रीजीवनाची नव्याने ओळख होणे, आर्थिक स्वावलंबन, इतर अभावग्रस्त मुली-स्त्रियांची जाणीव होणे, त्यांच्या जबाबदारीचे भान येणे हे सारे स्त्रीजीवनातील बदल स्त्री-परिषदांच्या पुनरावलोकनातून अधोरेखित होतात. आर्थिक-राजकीय-सामाजिक स्थित्यंतरांचा स्त्रीजीवनावर होणारा परिणाम यावरही हा ग्रंथ प्रकाश टाकतो. स्त्रियांचे मूलभूत हक्क, ते हक्क प्राप्त होण्यासाठी कायदेशीर तरतूद करण्यासाठी संघटित होणे, त्यावर साधक-बाधक चर्चा करणे आणि लोकशाही अबाधित राखणे हे महत्त्वाचे काम स्त्री-परिषदांनी आजवर पूर्ण केले आहे, याची सार्थ नोंद प्रस्तुत ग्रंथाद्वारे घेतलेली आहे. ग्रंथाची मांडणी करताना ऐतिहासिक कालक्रमाची शिस्त, तसेच त्याची कालक्रमानुसार मांडणी करून मग त्यावर भाष्य केले आहे. प्रस्तुत संशोधन विषयामागील संशोधनाची रूपरेषा, संशोधकाची अभ्यासदिशा आणि संशोधनाची फलनिष्पत्ती यांची सविस्तर चर्चा उपसंहारामध्ये केलेली आहे. महाराष्ट्रातील स्त्रीजीवनाची वाटचाल जाणून घेण्यासाठी हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

◆

रूपाली शिंदे
पुणे
चलभाष : ९९२१०४७४६१

---



शाखा कार्यवृत्त

**प्रकाश पायगुडे**

# म.सा.प. पुणे शहर कार्यवृत्त नोंद

(१ डिसेंबर २०१६ ते २८ फेब्रुवारी २०१७)

**दि. २५ ऑक्टोबर २०१६ : वंचित मुलामुलींसाठी दिवाळी फराळ :**

परिषदेत प्रथमच वंचित मुलांसाठी ऐन दिवाळीत फराळ व गप्पा-गोष्टी असा अनोखा उपक्रम राबविण्यात आला. या निमित्ताने थोरा-मोठ्यांच्या व्याख्यानाने गजबजून जाणारी परिषद बालकुमारांच्या प्रसन्न किलबिलाटाने गजबजली. परिषदेतील कर्मचारी ज्योत्स्ना नांदगीकर, तृप्ती कुलकर्णी, मीनाक्षी केळकर, शोभना कुलकर्णी, माधवी घाडगे यांनी सर्व मुलामुलींना अत्तर लावून औक्षण केले. संदीप खाडे यांनी उत्साही मुलामुलींचे फोटो काढले. दिवाळीचा फराळ तर दिलाच, पण प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते मुलामुलींना पुस्तके व कंपास भेट देण्यात आली. या वेळी संकेत देशपांडे, प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, ॲड प्रमोद आडकर उपस्थित होते.

**दि. २७ नोव्हेंबर २०१६ : आहिताग्नी राजवाडे स्मृतिदिन :**

राजवाडे यांच्या जीवनकार्यावर आधारीत संकेतस्थळाचे उद्‌घाटन डॉ. सदानंद मोरे यांच्या हस्ते झाले. शैला मुकुंद यांनी संकेतस्थळाची माहिती दिली. 'आहिताग्नी राजवाडे व्यक्ती आणि विचार' या विषयावर डॉ. मंगेश कुलकर्णी, डॉ. राजा दीक्षित व डॉ. सदानंद मोरे यांची व्याख्याने झाली.

**दि. २८ नोव्हेंबर २०१६ :**

'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत विमलाबाई गरवारे प्रशालेत प्र. के. घाणेकर यांनी 'नाण्यांचा इतिहास' या त्यांच्या शालेय अभ्यासक्रमात समाविष्ट असलेल्या धड्याविषयी विद्यार्थ्यांशी संवाद साधला.

**दि. २९ नोव्हेंबर २०१६ : माधव ज्युलिअन स्मृतिदिनः**

यंदा परिषदेतील पटवर्धन सभागृह बांधून ७५ वर्षे पूर्ण झाल्याचे औचित्य साधून महाराष्ट्र विधान परिषदेचे अध्यक्ष मा. नामदार श्री. रामराजे नाईक निंबाळकर यांच्या अध्यक्षतेखाली सभा सकाळी आयोजित करण्यात आली. डॉ. श्रीपाल सबनीस, प्रा. द. मा. मिरासदार, डॉ. प्र. चिं. शेजवलकर, हे उपस्थित होते. डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. न. म. जोशी, डॉ. वि. भा. देशपांडे, श्री. नाना जोशी, राजा फडणीस, ह. ल. निपुणगे या मान्यवरांचे सत्कार करण्यात आले. त्याचप्रमाणे कार्यालयीन सेवकांचे विशेष सत्कार करण्यात आले.

याच दिवशी सायंकाळी ६ ते ९ परिषदेत साहित्य रसिकांचा स्नेहमेळावा घेण्यात आला. त्याला भरघोस प्रतिसाद मिळाला. या निमित्ताने परिषदेच्या इमारतीवर विद्युत रोषणाई व फुलांच्या आकर्षक रांगोळ्या काढण्यात आल्या होत्या.

**दि. १६ डिसेंबर २०१६ :**

९० व्या साहित्य संमेलनाचे नवनिर्वाचित अध्यक्ष डॉ. अक्षयकुमार काळे यांचा पहिला जाहीर सत्कार कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते झाला. आडकर फाउंडेशन, रंगत संगत प्रतिष्ठान, मराठी प्रकाशक परिषद, संस्कृती प्रकाशन, महाराष्ट्र साहित्य कला प्रसारिणी सभा, साहित्यिक कलावंत प्रतिष्ठान, साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, काव्यशिल्प, साहित्यदीप, शब्दाई फाउंडेशन, सातारा जिल्हा ग्रंथ महोत्सव समिती, लोकमंगल ग्रुप, शब्दमित्र, चपराक प्रकाशन, जागर प्रतिष्ठान, मराठी विज्ञान परिषद, साहित्य कला संवर्धन मंडळ, दलित साहित्य परिषद, कथाभारती या प्रातिनिधिक संस्थांनी डॉ. काळे यांचा सत्कार केला. प्रा. रेखा इनामदार-साने व भारत सासणे यांनी डॉ. काळे यांच्याविषयी मनोगते व्यक्त केली.

**दि. १९ डिसेंबर २०१६ :**

मसाप, अक्षरधारा, आशय फिल्म क्लब यांच्या संयुक्त विद्यमाने 'व्यक्तीवेध - कवीवर्य नारायण सुर्वे' यांच्या जीवनकार्यविषयक फिल्म दाखविण्यात आली. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, रसिका राठीवडेकर, विरेंद्र चित्राव व



अनुक्रमणिका






प्रा. मिलिंद जोशी व्यासपीठावर उपस्थित होते. अध्यक्ष डॉ. कोत्तापल्ले यांचे समयोचित भाषण झाले.

**दि. २० डिसेंबर ते २२ डिसेंबर २०१६ : का. र. मित्र व्याख्यानमाला :**

'विनोद' या मध्यवर्ती संकल्पनेवर आधारीत ३ दिवसांची व्याख्यानमाला गुंफण्यात आली. 'विनोदी लिहितांना' या विषयावर उद्‌घाटनाचे व्याख्यान शिवराज गोर्ले यांनी दिले. 'व्यंगचित्रे व विनोद' या विषयावर मंगेश तेंडुलकर यांनी दुसरे पुष्प गुंफले व 'नाट्य-चित्रपटातील विनोद' या विषयावर श्रीनिवास भणगे यांनी तिसरे पुष्प गुंफले.

**दि. २३ डिसेंबर २०१६ : 'मसाप गप्पा' :**

या उपक्रमांतर्गत मुकुंद टाकसाळे यांच्याशी सुश्रुत कुलकर्णी यांनी संवाद साधला.

**दि. २७ डिसेंबर २०१६ :**

**श्री. म. माटे स्मृतिव्याख्यान:**

'आत्मचरित्रातून दिसणारे माटेमास्तर' या विषयावर डॉ. मेधा सिधये यांचे व्याख्यान झाले.

**दि. ३ जानेवारी २०१७ : श्रद्धांजली सभा :**

व्यंगचित्रकार वसंत सरवटे व कथाकथनकार व लेखक वामन होवाळ यांना श्रद्धाजली वाहणारी सभा शि. द. फडणीस यांच्या अध्यक्षतेखाली झाली. वि. दा. पिंगळे, मुकुंद टाकसाळे, शकुंतला फडणीस, धर्मराज निमसरकर, रविमुकुल, चारूहास पंडित, मंगेश तेंडुलकर, प्रा. मिलिंद जोशी यांची भाषणे झाली.

**दि. ५ जानेवारी २०१७ :**

**पर्यावरण स्नेही साहित्य संमेलन :**

११ व्या किर्लोस्कर वसुंधरा आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवानिमित्त स. प. महाविद्यालयात एक दिवसाचे संमेलन झाले. संत तुकारामांचा 'पर्जन्या पडतो आपुल्या' हा अभंग सादर झाला. उद्‌घाटक डॉ. विकास आमटे यांच्या हस्ते रोपाला पाणी घालून संमेलनाचे उद्‌घाटन झाले. तीन विद्यार्थ्यांचा सत्कार करून त्यांचे कौतुक करण्यात आले. डॉ. रामचंद्र देखणे, प्राचार्य डॉ. दिलीप सेठी, प्रा. विलास फडके, विरेंद्र चित्राव, प्रा. मिलिंद जाशी हे मान्यवर उपस्थित होते. डॉ. मंदार परांजपे यांनी डॉ. आमटे यांची मुलाखत घेतली. 'संत साहित्य आणि पर्यावरण' या विषयावर डॉ. देखणे यांचे अध्यक्षीय भाषण झाले. पर्यावरण विषयावर प्रत्यक्ष विद्यार्थ्यांचा सहभाग असलेले सादरीकरण झाले. 'रामायणातील पक्षी' या विषयावर अनिरूद्ध चावजी यांनी स्लाईड शो सादर केला. अशोक नायगावकर, रमजान मुल्ला यांचे काव्यवाचन झाले. समारोपात 'वसुंधरा ही माझी माता आहे' अशा मजकुराचा ठराव विद्यार्थ्यांकडून मांडला गेला व तो संमत झाला. डॉ. अनिल अवचट यांनी समारोप केला. परिषदेचे प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, माधव राजगुरू, दीपक करंदीकर हे आवर्जून उपस्थित होते.

**दि. १० जानेवारी २०१७ :**

'सुगम मराठी शुद्धलेखन' या पुस्तिकेचे प्रकाशन ज्येष्ठ अभ्यासक डॉ. प्र. ज्ञा. परांजपे, डॉ. न. म. जोशी यांच्या उपस्थितीत झाले. परिषदेचे कार्यवाह व भाषातज्ज्ञ प्रा माधव राजगुरू यांनी हे पुस्तक लिहिले आहे.

**दि. १३ जानेवारी २०१७ : मसाप गप्पा :**

भानू काळे यांची मुलाखत सदा डुंबरे यांनी घेतली.

**दि. २० जानेवारी २०१७ : दिवाळी अंक २०१६ स्पर्धा पारितोषिक वितरण समारंभ :**

लेखिका इंदुमती जोंधळे यांच्या अध्यक्षीय उपस्थितीत व विजय बावीस्कर यांच्या हस्ते पारितोषिक वितरण झाले. ज्योत्स्ना चांदुगडे व अनिल गुंजाळ हे परिक्षक होते. ऋता बावडेकर, किरण केंद्रे, नमिता कीर, वसंत आबाजी डहाके यांची मनोगते झाली. (या स्पर्धेचा सविस्तर निकाल सोबत प्रकाशित केला आहे.)

**दिवाळी अंक स्पर्धा २०१६चा निकाल :**

१. अ. स. गोखले स्मृत्यर्थ 'रत्नाकर पारितोषिक' भानू काळे यांच्या वतीने प्रा. बाळकृष्ण कवठेकर यांनी स्वीकारला. – अंक : अंतर्नाद, संपादक : भानू काळे, हस्ते विजय बावीस्कर.

२. चंद्रकांत शेवाळे पुरस्कृत ३ पारितोषिके :

अ. 'विविध ज्ञानविस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक, अंक : 'झपूर्झा', संपादक : नमिता रमेश कीर, हस्ते : विजय बावीस्कर.

ब. 'मासिक मनोरंजनकार का. र. मित्र पारितोषिक सकाळ साप्ताहिकच्या कार्यकारी संपादक ऋता बावडेकर यांनी हा पुरस्कार स्वीकारला. अंक : 'सकाळ साप्ताहिक', संपादक : श्रीराम पवार, हस्ते : इंदुमती जोंधळे.

क. शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक, अंक : 'चतुरंग अन्वय', संपादक : महेश कराडकर, हस्ते : इंदुमती जोंधळे.

३. जानकीबाई केळकर स्मृत्यर्थ उत्कृष्ट बाल-कुमार दिवाळी अंक पारितोषिक, अंकः 'किशोर', संपादक : डॉ. सुनील मगर, हस्ते विजय बावीस्कर.

४. दि. अ. सोनटक्के पारितोषिक (उत्कृष्ट कथेसाठी, कथा : 'बाटगी विहीर', लेखक : लक्ष्मीकांत देशमुख, अंक : उद्याचा मराठवाडा, हस्ते : विजय बावीस्कर.

५. अनंत काणेकर पारितोषिक (उत्कृष्ट ललितलेखासाठी), लेख : 'अर्धनारीश्वर', लेखक : वसंत आबाजी डहाके, अंक : पुणे पोस्ट, हस्ते इंदुमती जोंधळे.

६. डेलीहंट पुरस्कृत ऑनलाईन दिवाळी अंक पारितोषिक, अंक 'डिजीटल', संपादक : सायली राजाध्यक्ष, हस्ते : इंदुमती जोंधळे.

**दि. २३ जानेवारी २०१७ :**

**प. पू. परमहंस स्वरूपानंद स्मृतिव्याख्यान :**

'स्वामी स्वरूपानंदांचा गीता संदेश' या विषयावर डॉ. मुकुंद दातार यांचे व्याख्यान झाले. वसंतराव देसाई व प्रा. मिलिंद जोशी हे व्यासपीठावर होते. हा कार्यक्रम आनंद मंगल कार्यालयात झाला.

**दि. १७ फेब्रुवारी २०१७ :**

**सुहासिनी ईर्लेकर स्मृती पुरस्कार:**

अरूण म्हात्रे यांच्या हस्ते अभिजीत थिटे यांच्या कविता संग्रहाला हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. धनंजय तडवळकर व मृणालिनी कानिटकर जोशी हे परिक्षक होते. अभिजीत थिटे व अरूण म्हात्रे यांची यथोचित भाषणे झाली. यशवंत ईर्लेकर व कुटुंबिय उपस्थित होते.

**दि. २२ फेब्रुवारी २०१७ :**

**रा. श्री. जोग स्मृती पुरस्कार :**

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते 'मूल्यभानाची सामग्री' या ग्रंथासाठी हरिश्चंद्र थोरात यांना 'जोग स्मृती पुरस्कार' प्रदान करण्यात आला. त्याचप्रमाणे 'शब्द प्रकाशना'चे येशू पाटील यांनाही प्रकाशकाचा पुरस्कार देण्यात आला. डॉ. रेखा इनामदार-साने व मंदा खांडगे यांनी परिक्षक म्हणून काम केले.

**दि. २४ फेब्रुवारी २०१७ :**

**माधवराव मदाने स्मृतिव्याख्यान :**

'नोटाबंदी आणि अर्थक्रांती' या विषयावर उपयुक्त स्लाईड्स प्रेक्षकांना दाखवत दीपक करंजीकर यांचे व्याख्यान झाले. डॉ. व्ही. व्ही. घाणेकर उपस्थित होते. त्यांनी मदाने यांच्या आठवणी जागविल्या.

**दि. २६ फेब्रुवारी २०१७ :**

**स्वातंत्र्यवीर सावरकर पुण्यतिथी व्याख्यान :**

'नाटककार सावरकर' या विषयावर बार्शीच्या श्यामसुंदर मुळे यांचे व्याख्यान झाले. सावरकरांची 'सूत्रधारांस' ही दुर्मीळ कविता दीपक करंदीकर यांनी सादर केली.

**दि. २७ फेब्रुवारी २०१७ : मराठी भाषा दिवस व कुसुमाग्रज स्मृती पुरस्कार समारंभ :**

डॉ. मनोहर जाधव यांच्या हस्ते विष्णू थोरे यांच्या 'धूळपेरा ऊसवता' या कविता संग्रहाला व अक्षरबंध प्रकाशन, नाशिकच्या प्रवीण जोंधळे यांना पुरस्कार प्रदान करण्यात आले. परीक्षक स्वप्नील पोरे, पारितोषिक विजेते विष्णू थोरे व प्रवीण जोंधळे यांची भाषणे झाली.

**दि. २८ फेब्रुवारी २०१७ : राष्ट्रीय विज्ञान दिन :**

मराठी विज्ञान परिषद व मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने भाभा अणुसंशोधन केंद्राचे डॉ. संतोष टकले यांचे 'विश्वाचे अंतरंग' या विषयावर 'स्लाईड्स'च्या साहाय्याने व्याख्यान झाले. यशवंत घारपुरे, ॲड. प्रमोद आडकर, दीपक करंदीकर व्यासपीठावर होते. कार्यवाह नीता शहा व विनय र. र. हे विज्ञान परिषदेचे प्रतिनिधी म्हणून उपस्थित होते.

(प्रास्ताविक, सूत्रसंचालन, आभार प्रदर्शन, परिचय इ. कामे प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सुनीता राजे पवार, दीपक करंदीकर, बंडा जोशी, उद्धव कानडे, वि. दा. पिंगळे, ॲड. प्रमोद आडकर या सर्वांनी वेळोवेळी केली.)

**(कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर, कार्यवाह, मसाप, पुणे.)**

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे : मंगळवेढा शाखा

**दि. १-३-२०१७ :**

मराठी राजभाषा दिनानिमित्त काव्य, नाट्य, अभिनय सोहळा...

मसाप शाखा मंगळवेढा यांच्या वतीने दि. २७ फेब्रुवारी २०१७ रोजी मराठी राजभाषा दिनानिमित्त काव्य, नाट्य, अभिनय सोहळ्याचे आयोजन करण्यात आले होते. यामध्ये नाट्यकर्मी नारायण घुले यांचे 'नटसम्राट' नाटकातील नाट्य सादरीकरण झाले. सुप्रसिद्ध कवी शिवाजी सातपुते, इंद्रजित घुले, भारत मासाळ, सौ. लता माळी यांचा काव्याविष्कार आणि पंढरीनाथ खांडेकर यांचा 'वीज म्हणाली धरतीला' या नाटकातील प्रवेश साभिनय सादर झाला.

## मसाप भोर शाखेचे कार्यवृत्त

**दि. २६ व २७ नोव्हेंबर :**

भोर येथे दिनांक २६ व २७ नोव्हेंबर रोजी 'दुसरे फुले-शाहू-आंबेडकर विचार प्रसारक साहित्य संमेलन २०१६' अत्यंत दिमाखदारपणे पार पडले.

समता, बंधुत्व, न्याय म्हणजे लोकशाही असली, तरी भारतामध्ये २८ टक्के मुलांना शुद्ध पिण्याच्या पाण्यावाचून आयुष्याला मुकावे लागते. त्यामुळे याला लोकशाही म्हणायचे का? समता, न्याय, बंधुत्व यासाठी फुले, शाहू, आंबेडकर यांचे विचार सर्व थरांत रुजण्याची गरज आहे. त्याने विषमता दूर होईल, असे प्रतिपादन ज्येष्ठ अर्थतज्ज्ञ, माजी कुलगुरू डॉ. भालचंद्र मुणगेकर यांनी केले.

भोर येथील फुले, शाहू, आंबेडकर विचार प्रसारक मंडळ व तालुक्यातील समविचारी सामाजिक संस्था यांच्या वतीने घेण्यात आलेल्या दुसऱ्या फुले, शाहू, आंबेडकर साहित्य संमेलनात रविवारी (दि. २७) दुसऱ्या दिवसाच्या उद्घाटनप्रसंगी डॉ. मुणगेकर बोलत होते. शिवाजी विद्यालयाच्या संत गाडगेबाबा साहित्यनगरीत छत्रपती संभाजीराजे विचार मंचावर ज्येष्ठ साहित्यिक, समीक्षक डॉ. श्रीपाल सबनीस हे संमेलनाच्या अध्यक्षस्थानी होते. या वेळी डॉ. प्रदीप पाटील, कार्याध्यक्ष प्रा. डॉ. रोहिदास जाधव, सचिव कॉ. ज्ञानोबा घोणे, डॉ. सुरेश गोरेगावकर, प्रा. डॉ. प्रसन्न देशमुख आदी, तसेच साहित्यिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. डॉ. श्रीपाल सबनीस म्हणाले, की फुले, शाहू, आंबेडकरांच्या भूमिकांचा संवाद सामाजिक समतेच्या अनेक सूत्रांवर आधारित आहे. पण हा संवाद केवळ या तीनच महापुरुषांपुरताच मर्यादित नसून तो अनेक संत-महात्म्यांच्या कर्तृत्वालाही सुसंवादी ठरणारा आहे.

फुले, शाहू, आंबेडकर विचार प्रसारक मंडळाच्या वतीने दरवर्षी डॉ. बाबासाहेब आंबेडकर कार्यगौरव पुरस्कार देण्यात येतो. या वर्षी राज्यस्तरीय पुरस्कार ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ पी. एस. इनामदार, तर तालुकास्तरीय पुरस्कार येथील सामाजिक कार्यकर्ते अर्जुन शेलार यांना साहित्यिक प्रा. डॉ. मनोहर जाधव यांच्या हस्ते व माजी पोलिस अधिकारी अशोक धिवरे, उद्धव कांबळे, समीरण वाळवेकर, डॉ. अभयकुमार साळुंखे, छाया नानगुडे यांच्या उपस्थित देण्यात आला.

**साहित्यनगरीत स्वागताध्यक्ष आ. थोपटे यांची उपस्थिती :**

फुले, शाहू, आंबेडकर साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्ष आमदार संग्राम थोपटे यांच्या मातोश्रींचे पाच दिवसांपूर्वी निधन झाल्याने संमेलनावर दुःखाची छाया पसरली असतानाही साहित्य संमेलन यशस्वी होण्यासाठी दुःखात असतानाही कार्यकर्त्यांना आ. थोपटे यांनी सूचना दिल्या होत्या. या संमेलनाकडे आ. थोपटे येतील की नाही ही शंका संयोजकांना होती; परंतु उद्घाटक डॉ. भालचंद्र मुणगेकर यांचे भाषण सुरू असतानाच संमेलनस्थळी येऊन आ. थोपटे यांनी उद्घाटनाचे भाषण श्रोत्यांच्या रांगेत बसून ऐकले.

## यशंवतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलन, फलटण

**दि. ३ डिसेंबर २०१६ :**

यशवंतराव चव्हाण यांनी सत्ता हे सामाजिक परिवर्तनाचे आणि प्रगतीचे साधन मानले. सत्तेसाठी ते कधीही तत्त्वभ्रष्ट झाले नाहीत. आयुष्यभर नीतिमूल्ये जपल्यामुळे त्यांचा जनमानसातील प्रभाव आजही टिकून आहे. लोकमान्य टिळक यांच्यानंतर प्रचंड लोकमान्यता लाभलेले ते महाराष्ट्रातील एकमेव नेते आहेत, असे मत ज्येष्ठ विचारवंत प्राचार्य यशवंत पाटणे यांनी व्यक्त केले.

स्व. यशवंतराव चव्हाण स्मृतिदिनानिमित्त येथील श्रीराम एज्युकेशन सोसायटी, यशवंतराव चव्हाण स्मृती प्रतिष्ठान, सद्गुरू प्रतिष्ठान, महाराष्ट्र साहित्य परिषद फलटण शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित पाचव्या यशवंतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलनात अध्यक्षस्थानावरून डॉ. पाटणे बोलत होते. या वेळी व्यासपीठावर संमेलनाचे उद्घाटक माजी आमदार उल्हासदादा पवार, म.सा.प. सातारा जिल्हा प्रतिनिधी रवींद्र बेडकिहाळ, श्रीराम एज्युकेशन सोसायटीचे उपाध्यक्ष बापूसाहेब मोदी, यशवंतराव चव्हाण स्मृती प्रतिष्ठानचे चंद्रकांत जगताप, म.सा.प. फलटण शाखा अध्यक्ष प्राचार्य रवींद्र येवले आदी मान्यवर उपस्थित होते.

उल्हासदादा पवार म्हणाले, की चव्हाण साहेब हे दुसऱ्यांची मने जपणारे पण आपल्या विचारांशी कधीही प्रतारणा न करणारे नेते होते. त्यांच्या मनात सामान्य माणसांबद्दल प्रामाणिक भावना होती. साहित्य, कला,



अनुक्रमणिका

संस्कृती व लोकशाहीचे ते उपासक होते. कलात्मकता, करुणा व उदार मानवता हा त्यांचा स्थायीभाव होता. आज समाजात धर्म, जाती, पोटजाती यावरून प्रचंड तेढ निर्माण झाली आहे. त्या पार्श्वभूमीवर यशवंतविचार समाजाला तारक असून, हे विचार समाजाला देण्याचे काम या साहित्य संमेलनातून होत असल्याचे सांगून विचारांबरोबर आचरणाचेही साहित्य संमेलन घडावे अशी अपेक्षाही पवार यांनी या वेळी व्यक्त केली.

मसाप फलटण शाखेतर्फे देण्यात येणारा 'यशवंतराव चव्हाण साहित्यिक गौरव पुरस्कार' फलटण येथील ज्येष्ठ लेखक व कादंबरीकार रंगोपंत दाते यांना प्रदान करण्यात आला. त्याचा प्रातिनिधिक स्वीकार प्रा. विक्रम आपटे यांनी केला, तर 'यशवंतराव चव्हाण सहकार गौरव पुरस्कार' ज्ञानदीप क्रेडिट को-ऑप. सेवा सोसायटी, मुंबईचे संस्थापक अध्यक्ष विश्वनाथ पवार यांना प्रदान करण्यात आला. रोख रु. ५,०००/-, ग्रंथ, सन्मानपत्र, शाल, श्रीफळ व पुष्पगुच्छ असे या पुरस्काराचे स्वरूप होते.

संमेलनाच्या दुसऱ्या सत्रात 'आठवणीतील कविता' हा कार्यक्रम पार पडला. यामध्ये प्रसिद्ध कवींच्या गाजलेल्या निवडक कवितांचे सादरीकरण रवींद्र जंगम, प्रा. प्रभाकर पवार, ताराचंद्र आवळे, प्रा. विक्रम आपटे, प्राचार्य रवींद्र येवले, निकिता रसाळ यांनी केले. इ. ८वीतील विद्यार्थिनी कोमल लाला पवार हिच्या स्वरचित 'अहो बाबा' या कवितेने सर्वांचीच मने जिंकली. त्यानंतर प्रसिद्ध कथाकथनकार प्रा. रवींद्र कोकरे (फलटण), हिम्मत पाटील (सांगली) यांचे कथाकथन झाले.

साहित्याप्रमाणे समाजमन घडवणाऱ्या फलटणमध्ये झालेल्या भव्य ज्ञानेश्वरी पारायण सोहळ्याचे मार्गदर्शक ह. भ. प. जाधव महाराज, बबनराव निकम यांचा प्रतिनिधिक तसेच फलटण शहरातील सर्व पुतळे दररोज स्वतः धुऊन स्वच्छ करणारे समाजसेवक बंडू अहिवळे यांचा सत्कार उल्हासदादा पवार यांच्या हस्ते करण्यात आला.

## महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे जिल्हा

१. महाराष्ट्र साहित्य परिषदे(पुणे जिल्हा)तर्फे १८ डिसेंबर २०१६ रोजी ज्येष्ठ साहित्यिक डॉ. आनंद यादव यांना आदरांजली वाहण्यात आली. सदर कार्यक्रमात डॉ. आनंद यादव यांच्या ज्येष्ठ कन्या प्रा. कीर्ती मुळीक यांनी वडिलांच्या आठवणी सांगत त्यांचा साहित्यिक जीवनपट उलगडून सांगितला. तसेच एक वडील, एक माणूस म्हणून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आढावा घेतला. सदर कार्यक्रमास श्रीकांत चौगुले, विनिता ऐनापुरे, अपर्णा मोहिते आदी मान्यवर उपस्थित होते. राजन लाखे यांनी प्रास्ताविक केले, तर निलेश म्हसये यांनी सूत्रसंचालन केले.

२. दिनांक ६ जानेवारी २०१७ रोजी थोर साहित्यिक व नाटककार कै. राम गणेश गडकरी यांच्या पुतळ्याच्या तोडफोड प्रकरणी महाराष्ट्र साहित्य परिषदे(पुणे जिल्हा)तर्फे पिंपरी येथे निषेध सभा घेण्यात आली. सदर सभेत पिं. चिं. परिसरातील साहित्यिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. सदर सभेस राजन लाखे, श्रीकांत चौगुले, के. टी. सुतार, रुचिता देशपांडे, डी. बी. शिंदे, दीपक अमोलिक, रघुनाथ पाटील, दत्तू ठोकळे, मनोहर दीक्षित, यतिन पारेख, चंद्रकांत धस, सतीश सूर्यवंशी, किरण लाखे, किशोर पाटील, विनिता ऐनापुरे, अश्विनी रानडे, कवयित्री अपर्णा मोहिते, प्राची देशपांडे आदी साहित्यिक उपस्थित होते. सर्वांनी आपले सडेतोड विचार मांडले आणि या अशोभनीय, निंदनीय घटनेचा तीव्र निषेध नोंदवला.

३. दिनांक २७ फेब्रुवारी रोजी 'मराठी भाषादिन'निमित्त 'महाराष्ट्र साहित्य परिषद(पुणे जिल्हा)ने दिग्गज साहित्यिकांच्या रचनांच्या सादरीकरणाने मराठी राजभाषा दिन निगडी येथे साजरा केला.

सदर दिवशी 'गंध मराठीचा' या कार्यक्रमास सुरेश भट यांच्या कवितेने राजन लाखे सुरुवात केली आणि त्यानंतर दिग्गज साहित्यिकांच्या एकापेक्षा एक सरस रचनांचे सादरीकरण साहित्यिकांनी केले. त्यामध्ये माधुरी मंगरूळकर, अश्विनी रानडे, कमल सोवणे, माधुरी विचारे, किशोर पाटील, अनघा पाठक, अपर्णा मोहिते, रमाकांत श्रीखंडे, सुहासिनी येवलेकर, अश्विनी कुलकर्णी, दीपक सुराणा यांनी सहभाग घेतला. सदर कार्यक्रमास सामाजिक कार्यकर्ते दीपक कुलकर्णी, उद्योजक पारेख, संचालक गुलाबराव देशमुख, मसापचे राजन लाखे, धस उपस्थित होते. किरण लाखे यांनी सूत्रसंचालन केले, तर माधुरी मंगरूळकर यांनी आभार मानले.

४. महाराष्ट्र साहित्य परिषद(पुणे जिल्हा) आयोजित 'लेखक तुमच्या भेटीला!' हा कार्यक्रम गुरुवार दिनांक २ मार्च २०१७ रोजी एस. बी. पाटील पब्लिक स्कूल, पिंपरी-



अनुक्रमणिका

चिंचवड एज्युकेशन ट्रस्ट, रावेत येथे झाला. सुप्रसिद्ध साहित्यिक व शिक्षणतज्ज्ञ न. म. जोशी यांनी विद्यार्थ्यांशी खेळीमेळीच्या वातावरणात संवाद साधला व विद्यार्थ्यांना बोलते करून त्यांच्या शंकांचेही समाधानकारक निरसन केले. सदर कार्यक्रमास पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे उपस्थित होते.

## डोंबिवली- एक अनुभव

ज्यांच्याकडे कवितांचे भांडार असते अशा भाग्यवंतांनाच साहित्य संमेलनात निमंत्रित केले जाते, असे ज्येष्ठ कवी किशोर पाठक यांनी सांगितले. निमित्त होते महाराष्ट्र साहित्य परिषद- शाखा नाशिक रोडने आयोजित केलेल्या डोंबिवली- एक अनुभव या कार्यक्रमाचे. पुढे बोलताना ते म्हणाले, की मागील २५ वर्षांचा इतिहास सांगतो, की संमेलनातील अनुभव फार उपयुक्त असतो. पहिल्या वेळी तर समोर बसलेल्या दिग्गजांपुढे कविता सादर करताना आपला कस लागतो. आधीच्या कवीने काय सादर केले आणि पुढचा काय सादर करणार आहे याच्यावर आपल्याला आपली कविता निवडावी लागते.

शाखेचे कार्यवाह रवींद्र मालुंजकर यांची निमंत्रित कवींमध्ये निवड झाल्याबद्दल त्यांचा सत्कार पाठकांच्या हस्ते करण्यात आला. आपला अनुभव सांगतांना मालुंजकर म्हणाले, की मला खूप मोठे साहित्यिक भेटले आणि त्यांच्यासमोर कवीता सादर केल्याचा आनंद औरच आहे. या वेळी त्यांनी संमेलनातील कविता सादर केली. शाखा सभासद कवी गौरवकुमार आठवले आणि राधाकृष्ण साळुंके यांनी संमेलनात सादर केलेल्या गझल सादर केल्या. प्रा. डॉ. शंकर बोऱ्हाडे यांनी नाशिक रोड शाखेने पुढील साहित्य संमेलन भरवावे असा आग्रह केला. आशानगर सभागृहात १४ फेब्रुवारीला झालेल्या कार्यक्रमात अनेक रसिकांनी आपल्या अनुभवांचे कथन केले.

## मसाप चाळीसगाव शाखेचा कार्यवृत्तान्त

आनन-रमेश जुगलबंदीने चाळीसगावातील प्रेक्षकांना काव्यमैफलीद्वारा अत्यानंद दिला. या जुगलबंदीतून सर्व प्रकारची गीते एका व्यासपीठावर प्रथमच ऐकण्याची संधी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा चाळीसगावने उपलब्ध करून दिली. या कार्यक्रमाचे संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, कार्याध्यक्ष डॉ. संतोष मालपुरे, प्रमुख कार्यवाह रामचंद्र गोसावी, कलाकार रमेश पोतदार, आनन शिंपी उपस्थित होते. शेठ ना. बं. वाचनालय येथे १५ ऑगस्ट २०१५ रोजी सायंकाळी आल्हाददायक वातावरणात जुगलबंदीचा कार्यक्रम आनंदोत्सवात पार पडला.

या वेळी स्वरसाधना ग्रुपच्या सदस्यांचे व प्रायोजक सुभाष करवा, प्रा. बागुल, विजय पाटील यांचा सत्कार करण्यात आला.

या जुगलबंदीत आनन शिंपी यांच्या देशभक्तिपर गीताने सुरुवात करण्यात आली तर रमेश पोतदार यांनी स्वरचित देशभक्तिपर गीत सादर केले. जुगलबंदीत मराठी, हिंदी यांसह विविध भाषांतील गीतांचा समावेश करण्यात आला होता.

आनन शिंपी यांच्या विविध गीतांचा प्रेक्षकांनी साथ देऊन आनंद घेतला, तर रमेश पोतदार यांच्या सर्व स्वरचित कविता, गीते, विडंबनात्मक, रचनात्मक विनोदी साहित्याने रसिकांना लोटपोट हसविले. शेवटी कव्वालीने कार्यक्रमाची सांगता करण्यात आली.

माणसे ही देवधर्माच्या नावाने एकत्र येतात व कार्य करतात; मात्र त्यांच्या वर्तनात परिवर्तन होत नाही. असे कार्य समाजोपयोगी असते. संताचे कार्य हे समाजाला दिशा देणारे असते, असे प्रतिपादन प्राचार्य तानसेन जगताप यांनी 'संत शिरोमणी नामदेव महाराज यांचे साहित्यातील योगदान' या विषयावर विचार व्यक्त केले.

मान्यवरांच्या हस्ते संत नामदेव महाराज व ग्रंथाचे पूजन करण्यात आले. त्यानंतर तहसील कचेरीमार्गे शिंपी मंगल कार्यालयात ग्रंथदिंडीचा समारोप करण्यात आला. या वेळी ग्रंथ दिंडीत शिंपी समाज, मसापचे पदाधिकारी, सभासद, वाचक, ग्रंथमित्र, रसिक व नागरिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. राष्ट्रीय विद्यालयातील विद्यार्थ्यांचा उत्स्फूर्त प्रतिसाद व जयघोष यामुळे दिंडीची शोभा अधिक वाढली. वारकरी संप्रदायातील कीर्तनकार, महाराज व भजनी मंडळींच्या भजनामुळे दिंडीत आध्यात्मिक वातावरण निर्मिती झाली होती.

कार्यक्रमाचे प्रास्तविक व सूत्रसंचालन डॉ. संतोष मालपुरे यांनी केले. तर आभार सुनील सोनवणे यांनी मानले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद : ठाणे जिल्हा शाखा

**दि. २३–२–२०१७ :**

१. १५ ऑक्टोबर २०१६ रोजी प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प (वर्ष २९वे) प्रा. प्रतिभा सराफ यांच्या 'मी प्रतिभा, माझी प्रतिभा' या विषयावर आयोजित केले होते. या वेळी प्रा. सराफ यांनी आपला काव्य-लेखनप्रवास अनेक कविता, गझला सादर करून श्रोत्यांसमोर ठेवला. त्या म्हणाल्या, ''गझल ही कवितेप्रमाणेच बहुरूपिणी आहे, त्यामुळे मुशायऱ्याची गझल लिहिण्यात काही गैर नाही. स्त्रीकडे केवळ शरीर म्हणून, मादी म्हणून बघितलं जाऊ नये, तर तिचे मन किंवा आत्मा समजून घ्यायला हवा. आयुष्य हा खेळ आहे आणि लग्न हा जुगार आहे. आधीच जीत ठरते. साथी बनले आहे मी रोज हरणारी, आयुष्य खेळ आहे.'' या वेळी सुमित्रा सामंत यांनी त्यांच्या काही गझला गाऊन सादर केल्या.

२. १७ डिसेंबर २०१६ रोजी ९७व्या अखिल भारतीय मराठी नाट्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष, ज्येष्ठ अभिनेते जयंत सावरकर यांचा सत्कार व जाहीर मुलाखत आयोजित केली होती. या वेळी बोलताना सावरकर म्हणाले, ''कार्यातून आलेल्या अनुभवांच्या आधारे रंगभूमीशी संबंधित विविध समस्या मी सडेतोडपणे मांडणार आहे. अध्यक्षीय भाषणात मी रंगभूमीचा इतिहास सांगणार नसून, नाटकांचे दौरे वाढवणे, जास्तीत जास्त प्रयोग करणे, नाटकांच्या जाहिराती मुंबईव्यतिरिक्त वर्तमानपत्रांच्या सर्व आवृत्त्यांमध्ये मोफत छापण्यासाठी प्रयत्न करणे, अशा अनेक प्रश्नांसाठी प्रयत्नशील राहणार आहे. आजपर्यंत अनेक भूमिका केल्या तरी 'खडाष्टक'मधली कर्कशरावाची भूमिका साकारावयाची आहे.'' साहाय्यक भूमिका करून संमेलनाचा अध्यक्ष झालेला मी एकमेव कलाकार, असे ते शेवटी म्हणाले. मकरंद जोशी यांनी सावरकरांची मुलाखत घेतली. या कार्यक्रमात ठाणे नगर वाचन मंदिर आणि नाट्याभिमानी ठाणे या संस्था सहभागी झाल्या होत्या.

३. दि. २४ डिसेंबर २०१६ रोजी ९०व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष डॉ. अक्षयकुमार काळे मराठी ग्रंथसंग्रहालयाद्वारे आयोजित जाहीर सत्कारात शाखा सहभागी झाली होती. या वेळी डॉ. काळे यांचा परिचय कार्याध्यक्ष पद्माकर शिरवाडकर यांनी करून दिला.

४. दि. ८ जानेवारी २०१७ या दिवशी पूर्ण दिवशीय ९वे ठाणे जिल्हा मराठी साहित्य संमेलन आयोजित केले होते. प्रा. मिलिंद जोशी या संमेलनाचे अध्यक्ष होते. कविसंमेलन; अशोक चिटणीस, माधवी घारपुरे, शैला जोशी यांचे कथाकथन आणि 'साहित्य निर्मिती आणि समीक्षा– परस्परपूरक' या विषयावर परिसंवाद असे एकंदरीत कार्यक्रमाचे स्वरूप होते. परिसंवादात डॉ. अनंत देशमुख, डॉ. महेश केळुसकर व डॉ. कैलास जोशी यांचा सहभाग होता. कविसंमेलनातही अरुण म्हात्रे, सतीश सोळांकुरकर, किरण येले, रामदास खरे, राजीव जोशी, अनुपमा इजगरे इ. नामवंतांचा सहभाग होता. अध्यक्षस्थानी कविवर्य प्रा. अशोक बागवे होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद - शाखा नाशिक रोड : कार्यवृत्त

**२७ एप्रिल २०१५ :**

गेल्या वर्षीच्या दुष्काळाने माणसाचे निसर्गाशी असलेले नाते बदलून टाकले. कधी नव्हे एवढा परिणाम सामान्यांच्या जीवनावर झाला, त्यामुळे आता मात्र निसर्गाशी संवाद साधूनच माणसाला प्रगती साधावी लागेल. निसर्गाशी संवाद कसा साधायला हवा हे आपल्या देशात अनेकांनी दाखवून दिले आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली कार्य केल्यावर संभाव्य धोक्यापासून सुरक्षितता मिळवता येईल. असा संवाद साधणाऱ्यांत जलतज्ज्ञ मॅगसेसे पुरस्काराने सन्मानित मा. डॉ. राजेंद्रसिंहजी ऊर्फ भाईजी यांचे नाव सर्वांत अग्रेसर आहे.

सामाजिक प्रश्नांवर संवाद घडवून आणणे आणि दर्जेदार साहित्याच्या रूपातून जनतेला शिक्षित करण्याची जबाबदारी साहित्यिकांची आहे. या महत्कार्यात महाराष्ट्र साहित्य परिषदेची कृती वाखणण्याजोगी आहे. भविष्यातील पाणीटंचाईवर मात करण्यासाठी मानसिकता तयार करण्यात भाईजींची भूमिका मोलाची आहे. या थोर व्यक्तीसमवेत सामान्यांना गप्पा मारता याव्यात म्हणून शाखेने त्यांच्या समवेत ही चाय-पे-चर्चा आयोजित केली होती.

'नदी जोडण्याऐवजी नदीशी नाते जोडा' हे सांगताना राजेंद्रसिंहजी म्हणाले, की 'जसे माणसाच्या शरीरात रक्तवाहिन्यांचे महत्त्व आहे, तसेच जीवनात वरुणदेवाचे अर्थात नदीचे महत्त्व असल्याने भविष्यातील संकटे



अनुक्रमणिका

टाळण्यासाठी माणसाने लाखो-करोडो रुपये खर्च करून नद्या जोडण्याऐवजी नद्यांशी नाते जोडल्यास आपणास विनामूल्य शाश्वत भविष्य लाभेल. पृथ्वी, हवा, सूर्य, पाणी यांमुळे आपले जीवन समृद्ध आहे. त्यांच्या नैसर्गिक वृत्तीत बिघाड होणार नाही यासाठी प्रदूषणविरहित विकास करणे गरजेचे आहे.'

**२७ एप्रिल २०१५ :**

आई भगवती श्री सप्तशृंगीच्या आशीर्वादाने पर्यावरणाचा समतोल राखण्यासाठी सर्वांनी स्वयंस्फूर्तीने योगदान दिल्यास गडाचा परिसर प्लॅस्टिकमुक्त होऊ शकेल, अशी धारणा शाखा सभासदांची आहे. सामाजिक प्रबोधनाची प्रमुख जबाबदारी साहित्यिकांवर आहे. त्यामुळे फक्त साहित्यातून मार्गदर्शन करण्यावर अवलंबून न राहता प्रत्यक्ष कृती केल्यावर एक नवा दृष्टिकोन मोडता येईल याची खात्री पटल्यानेच 'स्वच्छ भारत अभियान'मधील प्लॅस्टिकमुक्त भारत या संकल्पनेवर कार्य करण्याचे ठरविले. शाखेचे हितचिंतक पर्यावरणप्रेमी राजेशजी पंडित यांनी श्री सप्तशृंग देवीच्या दरबारी प्लॅस्टिकबंदीसाठी पर्यावरणपूरक सुती कपड्याच्या दैनंदिन उपयोगात येणाऱ्या पिशव्या अर्पण कराव्यात, अशी कल्पना मांडली. अशा प्रकारच्या पिशव्यांना मोठा खर्च येतो. त्यामुळे शाखेने मालेगावच्या प्रिंटवेल प्रिंटर्सचे उदयजी शिंदे यांना आर्थिक जबाबदारी उचलण्याची विनंती केली. त्यांनी ती मान्य केल्याने शाखेस कोणतीही आर्थिक तोशिस न लागता उपक्रम करण्यात आला.

कार्यक्रमास प्रचंड संख्येने साहित्यरसिक व स्थानिक ग्रामस्थ उपस्थित होते. शाकंभरी नवरात्रोत्सवाची पर्वणी साधत देवीच्या पुण्यदर्शनाने सुरुवात झालेल्या कार्यक्रमास एच. ए. एल.चे फायर ऑफिसर बजरंग शिंदे, कळवण कॉलेजच्या प्राचार्य डॉ. सौ. उषा शिंदे, आयकर अधिकारी अनिल गुरव, ॲड. सुहास पाठक, ॲड. सौ. वर्षा देशमुख आदी उपस्थित होते.

कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठी कोशाध्यक्ष सुदाम सातभाई, कार्यकारिणी सदस्य दशरथ लोखंडे, जयंत गायधनी, शिवाजी म्हस्के यांनी प्रयत्न केले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर

**दि. २१-१०-२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि ज्येष्ठ नागरिक संघ, बंथनाळ मठ, जुळे सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने, इंडियन मॉडेल स्कूल, जुळे सोलापूरच्या सभागृहात शुक्रवार दिनांक २१-१०-२०१६ रोजी 'नटसम्राट' या नाटकाच्या अभिवाचनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. नागेश खमितकर, मनोज परांजपे, मीरा देशपांडे, स्मिता देशपांडे यांनी प्रियंका पतंगेसह नाट्याभिवाचन, केले तर सुभाष शास्त्री यांनी संगीत साथ केली. या कार्यक्रमाला अध्यक्ष म्हणून डॉ. वासुदेव रायते, तर प्रा. ए. डी. जोशी प्रमुख पाहुणे होते.

**दि. १८-१२-२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखेतर्फे अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी आणि उपाध्यक्ष प्रशांत जोशी यांच्या हस्ते डोंबिवली येथे होणाऱ्या ९०व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी मा. डॉ. अक्षयकुमार काळे यांची निवड झाल्याबद्दल दि. १८-१२-२०१६ रोजी, त्यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी प्रमुख कार्यवाह गिरीश दुनाखे, श्रीकांत कुलकर्णी, ज्येष्ठ कवी गोविंद काळे, तसेच मसाप जुळे सोलापूर आजीव सदस्य असलेले सोलापूर महानगरपालिकेतील विरोधी पक्षनेते नरेंद्र काळे आवर्जून उपस्थित होते.

**दि. २९-१२-२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि प्रिसिजन फाउंडेशन, सोलापूर आयोजित 'स्व. दत्ता हलसगीकर श्रेष्ठ साहित्यिक पुरस्कार २०१६' यंदा कवयित्री आणि प्रसिद्ध अभिनेत्री मा. स्पृहा जोशी (मुंबई) यांना माजी केंद्रीय गृहमंत्री, सुशीलकुमार शिंदे यांच्या शुभहस्ते आणि महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे कार्याध्यक्ष, प्रा. मिलिंद जोशी यांच्या प्रमुख उपस्थितीत दिनांक २९-१२-२०१६ रोजी हिराचंद नेमचंद वाचनालयाच्या डॉ. वा. का. किर्लोस्कर सभागृहात सन्मानपूर्वक प्रदान करण्यात आला. रोख रु. ११,१११/-, चांदीचे कमळ असलेले स्मृतिचिन्ह, मानपत्र आणि शाल, श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरूप होते.

याच समारंभात डॉ. वासुदेव रायते, प्रा. ए. डी. जोशी तसेच नारायण कुलकर्णी या सल्लागारांचा आणि आम्हाला प्रायोजकत्व दिलेल्या भरत दावडा, जनता बँक, रणजित विश्वरूपे, अजय चिंचोळकर, माधव देशपांडे, अनिरुद्ध जोशी यांचा मान्यवरांच्या हस्ते सत्कार करण्यात

आला. या वेळी डॉ. माधवी रायते, डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली, जोहडकर, मा. सुरेखा शहा, दीपक कलढोणे, कवी माधव पवार, मारुती कटकधोंड, हलसगीकर परिवार, आकाशवाणीचे कार्यक्रम अधिकारी सुनील शिनखेडे यांच्यासह रसिक मान्यवर तसेच कार्यकारिणी सदस्य हजर होते.

पुरस्कार सोहळा सुरू करण्यापूर्वी शशिकांत लावणीस आणि मसाप, जुळे सोलापूरच्या कार्याध्यक्षा सायली जोशी यांनी स्व. हलसगीकर आणि स्मृहा जोशी यांच्या काही कवितांचे वाचन केले.

**दि. १२-२-२०१७ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि रोटरी क्लब ऑफ जुळे सोलापूर यांच्या सहकार्याने वृत्तदर्पण चॅनेल व गुरुकुल कॉम्प्युटर्सतर्फे 'परीक्षेला सामोरे जाताना' हा इयत्ता इयत्ता १० वीच्या विद्यार्थ्यांसाठी एक प्रेरणादायी कार्यक्रम दिनांक १२ फेब्रुवारी २०१७ रोजी टॉयल पाम, टंगसाळ पॉपिंग सेंटर, आसरा चौक, घेटगी रोड, सोलापूर येथे आयोजित केला होता. या कार्यक्रमामध्ये ज्येष्ठ पत्रकार आणि ज्येष्ठ शिक्षण समुपदेशक अरविंद जोशी आणि संगणक तज्ज्ञ असलेले अविनाश मठपती यांनी अनुक्रमे, 'परिक्षेतील ताणतणाव' व 'स्मार्ट सिटी, स्मार्ट विद्यार्थी' या विषयांवर विद्यार्थ्यांना उत्तम आणि मोलाचे मार्गदर्शन केले.

**दि. १०-३-२०१७ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि संतोषी महिला मंडळ, शिवगंगानगर यांच्या संयुक्त विद्यमाने महिलादिनाचे औचित्य साधून 'पाककला स्पर्धा' दिनांक १०-३-२०१७ रोजी शिवगंगानगर, जुळे सोलापूर येथे आयोजित केली होती. त्याला महिलावर्गाचा चांगला प्रतिसाद मिळाला.

**दि. १०-३-२०१७ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि आकाशवाणी सोलापूर केंद्र यांच्या संयुक्त विद्यमाने मराठी दिन तसेच कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांचा जन्मदिन २७ फेब्रुवारी ते त्यांचा स्मृतिदिन १० मार्चपर्यंत मराठी भाषा जागर पंधरवडा साजरा केला जातो त्या अनुषंगाने शुक्रवार दिनांक १० मार्च २०१७ रोजी हिराचंद नेमचंद वाचनालयाच्या डॉ. वा. का. किर्लोस्कर सभागृहामध्ये महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांचे 'लाभले आम्हास भाग्य बोलतो मराठी' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते. आकाशवाणीचे सहायक संचालक (कार्यक्रम) सुनिल चिनखेडे, उपाध्यक्ष प्रशांत जोशी, अभिराम सराफ आणि सोलापुरातील मान्यवर साहित्यरसिक उपस्थित होते.

## म. सा. प. धुळे जिल्हा शाखा

**मसाप धुळे जिल्हा शाखेच्या अध्यक्षपदी एस. बी. रावळे यांची निवड.**

महाराष्ट्र साहित्य परिषदचे अध्यक्ष प्रा. अनिल सोनार यांनी राजीनामा दिल्याने कार्यकारिणीच्या सभेत एस. बी. रावळे यांची अध्यक्षपदी निवड करण्यात आली.

या प्रसंगी कार्यवाह प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे, कार्याध्यक्ष मोहन मोरे, उपाध्यक्ष पापालाल पवार, जिल्हा प्रतिनिधी प्रा. डॉ. शशकिला पवार, कार्यकारिणी सदस्य भगवान पाटील, प्रा. उषा पाटील तसेच उपाध्यक्ष प्रा. राजश्री शेलकर उपस्थित होत्या.

या सभेत धुळे जिल्हा मसाप शाखेचे ज्येष्ठ कार्यकारिणी सदस्य दादासाहेब विश्वनाथ मोराणकर यांचे निधन झालेले असल्यामुळे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली.

**दि. २०-१०-२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, धुळे व नंदुरबार जिल्हा शाखा आणि गरुड वाचनालय, धुळे यांच्या संयुक्त विद्यमाने कै. प्रा. डॉ. कुसुमाकर शिंपी, कै. विद्याधर वैद्य, कै. नगराज बोरसे, दिवंगत सुलभाताई दयाराम कावीस्कर यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. २६ सप्टेंबर २०१६ सोमवार रोजी व्याख्यानाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. धुळे शहरातील प्रसिद्ध पत्रकार व साप्ताहिक ज्ञानयोग साधनाचे संपादक रमेश दाणे यांचे 'आजची जीवनशैली : म. गांधी आणि साने गुरुजी यांची प्रासंगिकता' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते. त्यांनी आपल्या व्याख्यानात म. गांधी आणि साने गुरुजी यांच्या जीवनशैलीविषयी विविध प्रसंगांचे वर्णन केले. अध्यक्षीय समारोप मसाप, धुळे जिल्हा शाखेचे अध्यक्ष एस. बी. रावळे यांनी केला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्याध्यक्ष मोहन मोरे यांनी केले.

**दि. २०-१०-२०१६ :**

दि. २०-१०-२०१६ रोजी मसाप, धुळे जिल्हा शाखेतर्फे गरुड वाचनालय, धुळे येथे 'वैभवशाली खान्देशचा इतिहास' या विषयावर प्रा. डॉ. सर्जेराव भामरे यांचे व्याख्यानाचा कार्यक्रम झाला. म. सा. प. धुळे जिल्हा





अनुक्रमणिका

## म. सा. प. (पुणे) स. प. महाविद्यालय (पुणे) आणि किर्लोस्कर वसुंधरा महोत्सव यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित : पर्यावरणस्नेही साहित्य संमेलन

**दि. ६-१-२०१७ :**

"शब्द हे साहित्याचे शरीर आहे, भाव हे त्याचे सौंदर्य आहे तर चिंतन हा त्याचा आत्मा आहे. वेद, उपनिषदे, प्राचीन साहित्य आणि संतवाङ्मयातून व्यक्त झालेले पर्यावरणाविषयीचे चिंतन आजच्या लोकजीवनालाही पर्यावरणाची वेगळी दृष्टी देऊन जाते. साहित्य म्हणजे एकीकडे अंतर्मनाशी तर दुसरीकडे लोकमनाशी केलेला शब्दसंवाद होय.

'मानवाचे आध्यात्मिक जीवन समृद्ध होण्यासाठी संतांनी भक्तितत्त्व, अध्यात्मचिंतन आणि तात्त्विक मूल्यांची शिकवण दिली, तसेच ज्या देहाच्या आधारे परमात्म स्वरूपाकडे जायचे आहे तो देह निरोगी, सुदृढ, प्रसन्न आणि आनंदी राहावा यासाठी पर्यावरणाचे मोठेपण सांगितले आहे. ज्याच्या सान्निध्यात मानवी देह वावरणार आहे ते निसर्गसान्निध्य विपुल, व्यापक आणि शुद्ध असायला हवे अशी संतांची धारणा आहे.

ब्रह्मतत्त्वाच्या निरूपणाइतकेच वृक्षतत्त्वाचे निरूपण, परोपकारी तत्त्वाइतकेच निसर्ग घटकांचे त्यागी जीवन आणि अद्वैताइतकेच निसर्ग परिवाराचे व्यापकत्व सांगताना संतांनी प्रवृत्तिवादाचेच दर्शन घडविले आहे.

रवींद्रनाथांना नदीच्या झुळझुळणाऱ्या प्रवाहात, सूर्याच्या तेजस्वी किरणांत, वृक्षांच्या पानांच्या सळसळाटात, ऋतूंच्या तालबद्ध परिक्रयेत विश्वचैतन्याचे मनोज्ञ दर्शन घडले. संत ज्ञानदेवांचा चिद्विलासवाद, तर रवींद्रनाथांचा सौंदर्यवाद हा परमात्मा आणि विश्व यांना निसर्गतत्त्वाने जोडणारा आहे. निसर्ग घटकांनीच विश्वचैतन्य साजिवंत झाले. आज त्या विश्वसौंदर्याला आणि विश्वचैतन्याला आपण पारखे होतो की काय अशी अवस्था निर्माण झाली. वाढती लोकसंख्या, वाढते औद्योगिकीकरण, वाढते शहरीकरण, वाढते प्रदूषण, बदललेली जीवनशैली आणि निसर्गाला दुखावून काही तरी मिळविण्याचा हव्यास यातून पर्यावरणाची गंभीर समस्या निर्माण झाली. निसर्गवैभव आटले. सदाहरित वसुंधरा म्हातारी दिसू लागली. एकीकडे वृक्षतोडीने अरण्यसंपत्ती लयाला जाऊ लागली, तर त्याच वृक्षतोडीने गावगाड्यातील बोलका शिवार मुका झाला. म्हणूनच संतांनी तत्त्वज्ञानाचे सिद्धांत सांगताना हेतुपूर्वक निसर्गाचेच दृष्टान्त दिले आहेत.

*वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे*
*पक्षी ही सुस्वरे आळविती*

असे सांगत पर्यावरणाशी नाते सांगणारी संतांची पर्यावरणदृष्टी ही दूरगामी होती, हे लक्षात येते.

## फलटण शाखा कार्यवृत्त

**दि. ८ फेब्रुवारी २०१७ :**

वेगवेगळ्या भाषांतील दर्जेदार साहित्याचे भाषांतर झाले पाहिजे. यातून संस्कृतिवैविध्य समजते. लेखनात व्यक्तिगत जीवनाचा अंतर्भाव जरूर असतो, परंतु थोडा त्याला कल्पनेचा मुलामाही असतो. काळानुसार साहित्य हे बदलायलाच हवे. साहित्य हे समाजमनात बदल घडवून आणण्याचे उत्तम साधन आहे. साहित्य हे जीवनाचे प्रामाणिक आणि संतुलित चित्रण असले पाहिजे, असे विचार इंग्रजीतील ज्येष्ठ कादंबरीकार आणि साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त लेखिका पद्मश्री शशी देशपांडे यांनी व्यक्त केले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या फलटण शाखेच्या वतीने येथील महात्मा एज्युकेशन सोसायटीच्या श्रीराम विद्याभवनमध्ये आयोजित 'मुक्त साहित्यिक वार्तालाप' या कार्याक्रमादरम्यान त्या बोलत होत्या. या मुक्त चिंतनात्मक कार्यक्रमात शशी देशपांडे यांनी मोकळेपणाने उत्तरे दिली.

भाषा कोणत्याही प्रकारची असो, तिला समृद्धी असतेच. त्यामुळे अनेक भाषांतून साहित्य निर्माण झाले आहे. लिहिणे हे माझे काम आहे, वाचणे हे वाचकांचे काम आहे; परंतु आज वाचक कमी होतोय. निदान मराठी साहित्याबद्दल हे अधिक खरं आहे. आई-वडिलांनी लिहिलेली पुस्तके मुले वाचू शकत नाहीत, हे आजचे खेदजनक वास्तव आहे. परंतु वाचक कमी होत असले तरी लेखकांनी विविधांगाने लिहीत जावे, असेही शशी देशपांडे यांनी नमूद केले.

या वेळी साहित्य परिषद, फलटण शाखा व महात्मा एज्युकेशन सोसायटीच्या वतीने पद्मश्री शशी देशपांडे यांचा सत्कार परिषदेचे सातारा जिल्हा प्रतिनिधी रवींद्र बेडकिहाळ व फलटण शाखा अध्यक्ष प्राचार्य रवींद्र येवले यांनी केला.



निमित्ताने

प्रकाश पायगुडे

# 'मसाप'च्या माधवराव पटवर्धन सभागृहाचा अमृतमहोत्सव समारंभ संपन्न

महाराष्ट्रातील आद्य साहित्यसंस्था असलेल्या आणि शतकोत्तर दशकपूर्तीकडे वाटचाल करणाऱ्या 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चे वैभव म्हणजे परिषदेचे 'माधवराव पटवर्धन सभागृह'. अनेक दिग्गजांच्या भाषणांचे, संमेलनाध्यक्षांच्या विचारांचे, नामवंत कवींच्या काव्यवाचनाचे, पुस्तक प्रकाशन सोहळ्याचे आणि वाङ्मयीन वाद-चर्चेचे साक्षीदार असलेल्या माधवराव पटवर्धन सभागृहाची कोनशिला २९ नोव्हेंबर १९४१ रोजी साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांच्या हस्ते बसविण्यात आली. त्याला यंदा ७५ वर्ष पूर्ण होत आहेत. त्या निमित्ताने 'मसाप'तर्फे विशेष कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले होते. २९ नोव्हेंबरला सकाळी ११ वाजता पटवर्धन सभागृहात झालेल्या विशेष समारंभात विधान परिषदेचे सभापती रामराजे नाईक-निंबाळकर प्रमुख अतिथी म्हणून उपस्थित होते. मसापचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या समारंभात ८९ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. श्रीपाल सबनीस, मसापचे पूर्वाध्यक्ष राजेंद्र बनहट्टी, प्रा. द. मा. मिरासदार आणि डॉ. प्र. चिं. शेजवलकर आदी मान्यवर उपस्थित होते.

प्रा. मिलिंद जोशी या वेळी म्हणाले, की 'मसापच्या वास्तूतील माधवराव पटवर्धन सभागृह हे विचारपीठ आहे. या विचारपीठावरून विचार व्यक्त करण्यात साहित्यिकांना नेहमीच धन्यता वाटत आली आहे. सभागृहाला असलेली गॅलरी, सभागृहाच्या दर्शनी भागात लावलेले आणि नी. म. केळकर यांनी रेखाटलेले माधवराव पटवर्धन यांचे तैलचित्र आणि आजवरच्या सर्व संमेलन अध्यक्षांच्या समान आकारातल्या छायाचित्रांमुळे या सभागृहाला एकप्रकारे साहित्यमंदिराचेच रूप प्राप्त झाले आहे; म्हणूनच समृद्ध परंपरा असलेल्या या विचारपीठाचा अमृतमहोत्सव परिषदेने वेगळ्या पद्धतीने साजरा करण्याचे ठरविले.'

या निमित्तानेच मसापच्या वतीने मंगळवार दि. २९ नोव्हेंबर रोजी सायं. ६ ते ९ या वेळेत साहित्यप्रेमींच्या स्नेहमेळाव्याचेही आयोजन करण्यात आले होते. साहित्यप्रेमींनी मोठ्या संख्येने या स्नेहमेळाव्याला उपस्थित दर्शवली. कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे आणि कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार आणि अन्य पदाधिकाऱ्यांनी परिश्रम घेतले.

**माधवराव पटवर्धन सभागृहाचा इतिहास**

मसापच्या कार्यकारी मंडळाचे सभासद, पत्रिकेचे संपादक आणि १९३६ साली जळगावला झालेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष अशा त्रिविध नात्यानी प्रसिद्ध कवी माधव जूलियन तथा माधवराव पटवर्धन परिषदेशी संबंधित होते. त्यांचे २९ नोव्हेंबर १९३९ रोजी पुण्यात अकाली निधन झाले. त्यांच्या निधनामुळे सारा महाराष्ट्र हळहळला. मसापने त्यांचे यथोचित स्मारक करण्याची योजना आखून निधी गोळा करण्यास प्रारंभ केला. साहित्यिक वि. द. घाटे आणि ख्रिस्तवासी रावसाहेब रघुवेल लुकस जोशी या दोघांच्या विशेष प्रयत्नामुळे संकल्पित निधी जमला. फलटणचे मालोजीराजे नाईक-निंबाळकर यांनी या सभागृहासाठी ३५०० रुपयांची देणगी दिली. २९ नोव्हेंबर १९४१ रोजी माधवराव पटवर्धन सभागृहाची कोनशिला साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांच्या हस्ते बसविण्यात आली. नव्या कार्यकारिणीने या सभागृहाचे नूतनीकरण करून तेथे मसापचे जन्मस्थळ असलेल्या मळेकर वाड्याची आणि संस्थापकांच्या प्रतिमा लावून त्यांच्या स्मृती जागवल्या आहेत.

◆



अनुक्रमणिका

# क्षणचित्रे




डॉ. अरुणा ढेरे यांची नीलिमा बोरवणकर यांनी घेतलेली मुलाखत ऐकण्यासाठी साहित्य रसिक मोठ्या संख्येने उपस्थित होते.



महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार कवी विष्णू थोरे आणि प्रकाशक अक्षरबंध प्रकाशनाचे प्रवीण गोंधळे याना डॉ. मनोहर जाधव यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. सोबत परिषदेचे पदाधिकारी.




८९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनातील 'कवीकट्टा' यातून निवडलेल्या निवडक 'एकोणनव्वद कविता' या पुस्तकाचे प्रकाशन प्रसंगी डॉ. श्रीपाल सबनीस, डॉ. अक्षयकुमार काळे, डॉ. पी. डी. पाटील आणि मान्यवर.

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

संपूर्ण संच ५२५०/- रुपयांत

## संचाची किंमत

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला : | | रु. ५००/- |
| खंड २ रा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ७००/- |
| खंड ३ रा : | | रु. ३५०/- |
| खंड ४ था : | | रु. ४००/- |
| खंड ५ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३५०/- |
| खंड ६ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३००/- |
| खंड ७ वा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ८००/- |
| | भाग ३ : | रु. ७००/- |
| | भाग ४ : | रु. ७००/- |
| | एकूण | रु. ७०००/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/-** डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मराठी वाङ्मयाचा इतिहास — खंड सातवा : १९५० ते २००० — भाग तिसरा

मराठी वाङ्मयाचा इतिहास — खंड सातवा : १९५० ते २००० — भाग चौथा

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद**, टिळक रस्ता, पुणे – ४११ ०३०. दूरभाष : ०२०– २४४७५९६३

बुक-पोस्ट

प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : March 2017
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

